


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३७ । अंक ७ । एप्रिल १९८४
किमत ४ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये



---

## निवेदन

१ मे, १९८४ रोजी "नवभारत" आपला **महाराष्ट्र राज्य विशेषांक** (मे–जून १९८४ जोडअंक) प्रसिद्ध करीत आहे. महाराष्ट्रातील राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक विषयांवरील नामवंतांचे लेख ह्या विशेषांकात अंतर्भूत आहेत.

**ह्या अंकातील काही लेख-विषय :**

■ महाराष्ट्रातील राजकीय पक्ष व प्रवृत्ती ■ संयुक्त महाराष्ट्राची उद्दिष्टे : काय साधले ? काय राहिले ? ■ महाराष्ट्रातील बदलता दलित तरुण ■ महाराष्ट्रातील लघु व मध्यम उद्योगांत मराठी तरुण ■ महाराष्ट्रातील मत्स्योद्योग ■ महाराष्ट्रातील कृषि-औद्योगिक विकास इत्यादी.

**खालील लेखकांचा सहभाग :**

श्री. पन्नालाल सुराणा; डॉ. य. दि. फडके; डॉ. भास्कर भोळे; श्री. अर्जुन डांगळे; डॉ. भा. र. साबडे; डॉ. बी. डी. टिळक; डॉ. चं. वि. कुलकर्णी इत्यादी.

**अध्यक्ष व विश्वस्त**
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

---

**संपादकीय पत्रव्यवहार :**

मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**

श्री. ग दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
( जि. सातारा )

---

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.










# नवभारत

एप्रिल १९८४

अ नु क्र म



## लेखक-परिचय

■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी :** विद्वान, विचारवंत, लेखक व मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक वाई–४१२ ८०३. ■ **रा. ना. चव्हाण :** दलित–मित्र, सामाजिक कार्यकर्ते, सामाजिक चळवळींचे चिकित्सक अभ्यासक व लेखक; १३७८ रविवार पेठ, वाई–४१२ ८०३. ■ **चंद्रशेखर जहागिरदार :** प्रपाठक, इंग्रजी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर– ४. ■ **शरद् पाटील :** मार्क्सवादी विचारवंत, लेखक व राजकीय–सामाजिक कार्यकर्ते; असंतोष, वाडी–भोकर रस्ता, धुळे–४२४ ००२.

○ ○ ○

श्री. श्रीकृष्ण खडपेकर ह्यांच्या 'आपण बोलतो तसं लिहितो का ?' ह्या लेखाचा उत्तरार्ध काही अपरिहार्य कारणांस्तव ह्या अंकात आम्ही प्रसिद्ध करू शकलो नाही, ह्याबद्दल दिलगीर आहोत. हा उत्तरार्ध आता जुलै, १९८४ ह्या अंकात प्रसिद्ध केला जाईल.

तसेच स्थलाभावी ह्या अंकात 'वादसंवाद' आणि 'अक्षरवेध' ही नेहमीची सदरे अंतर्भूत करता आली नाहीत, ह्याबद्दलही दिलगीर आहोत.

– संपादक

## संपादकीय

### आधुनिक बौद्ध आणि आधुनिक हिंदू

अनेक बौद्ध नेते असे म्हणताना आढळतात की सामाजिक विषमता हे हिंदू धर्माचे अंगभूत वैशिष्टय आहे. हिंदू धार्मिक सिद्धांतांत आदर्श समाज हा विषमतेवर आधारलेला समाज असतो हा सिद्धांत अंतर्भूत आहे. जातिव्यवस्थेचे मूळ काहीही असो, विषमतेचा परिपोष करणाऱ्या ह्या व्यवस्थेला हिंदू धर्माने प्रामाण्य दिले आहे. समजा, अस्पृश्यतेसारखी भयानक प्रथा तात्पुरती बाजूला सारली. ' चांडाल ' हा वर्ग तात्पुरता दृष्टिआड केला. तरी जातिव्यवस्था उरतेच. ज्या समाजाने हिंदू धर्माचा स्वीकार केला आहे आणि जो परंपरेने हिंदू धर्माचे पालन करीत आला आहे त्या समाजात जातिव्यवस्थाही आढळते असा हिंदू धार्मिक सिद्धांतांचा आणि जातिव्यवस्थेचा बाह्य संबंध नाही. उदा., सतराव्या शतकात परंपरेने ख्रिस्ती असलेला जो युरोपीय समाज होता त्यातील पुरुष पाटलोणी, शर्ट, कोट असा पोषाख करीत. ख्रिस्ती धार्मिक श्रद्धा आणि हा वेष यांच्यांत केवळ बाह्य, आगन्तुक संबंध आहे. ख्रिस्ती धार्मिक सिद्धांतांवर गाढ श्रद्धा राखणारा आणि आपल्या जीवनात त्यांचे पालन करण्याचा पराकोटीच्या निष्ठेने प्रयत्न करणारा एखादा माणूस घेतला तर तो हा विशिष्ट वेष धारण करणे ख्रिस्ती म्हणून आपल्यावर बंधनकारक आहे असे मानणार नाही. धोतर आणि उपरणे परिधान करणारा माणूसही आचाराने आणि विचाराने निष्ठावान ख्रिस्ती असू शकतो. भारतीय माणसे ख्रिस्ती बनली की त्यांनी पाश्चात्त्य खाणे खाल्ले पाहिजे, पाश्चात्त्य पोषाख केला पाहिजे, पाश्चात्त्य संगीत ऐकले-गायिले पाहिजे आणि इंग्रजी-पोर्तुगीजसारखी पाश्चात्त्य भाषा आपली मातृभाषा मानली पाहिजे असे काही ख्रिस्ती धार्मिक बंधन नाही. भारतीय ख्रिस्ती गेल्या तीन शतकांत अशा रीतीने वागत असले तर त्याची कारणे वेगळी आहेत. ती ख्रिस्ती धार्मिक श्रद्धेत अंतर्भूत नाहीत.

पण हिंदू धार्मिक श्रद्धेचा आणि जातिव्यवस्थेचा असा बाह्य संबंध नाही. हिंदू धार्मिक सिद्धांतांप्रमाणेच, प्रमाण धार्मिक ग्रंथांप्रमाणेच जी विहित समाजव्यवस्था आहे, समाजाने जी व्यवस्था पाळणे योग्य आहे व त्याच्यावर बंधनकारक आहे ती जातिभेदावर आधारलेली व्यवस्था आहे. आता असा श्लेष काढता येईल की हिंदू धर्माने ज्या समाजव्यवस्थेला प्रामाण्य दिले आहे ती जातिव्यवस्था नाही, ती वर्णव्यवस्था आहे. हा वर्णाश्रमधर्म आहे; जात्याश्रमधर्म नाही. पण वर्णव्यवस्था ही विषमतेला प्रामाण्य देणारी व्यवस्था आहे. आणि शिवाय मनूपासून ज्या समाजाचे नियमन स्मृतिग्रंथ करीत होते तो केवळ वर्णसमाज नव्हता. म्हणजे केवळ चार वर्णांचा मिळून बनलेला समाज नव्हता. तर वर्ण आणि ' वर्णसंकरा'ने निर्माण झालेले मधले वर्ग म्हणजे जाती यांचा समाज होता. तेव्हा जातिभेद आणि सामाजिक विषमता ह्या गोष्टी हिंदू धार्मिक श्रद्धेतच अंतर्भूत आहेत. त्यांची हिंदू धार्मिक श्रद्धेपासून फारकत करताच येणार नाही.

इतर धार्मिक श्रद्धांचे असे नाही. उदा., ख्रिस्ती श्रद्धेचे असे नाही. मध्ययुगीन युरोपीय ख्रिस्ती समाज घेतला तर तो सरंजामी समाज होता. जातिव्यवस्थेची आठवण करून देईल असा, माणसांना समाजाच्या भिन्नभिन्न थरांत लोटून त्यांत डांबून ठेवणारा, आणि श्रेष्ठत्व–कनिष्ठत्वाच्या नात्यांनी ह्या थरांना एकत्र जखडून त्यांतून समाजाला एकता देणारा असा तो समाज होता. आणि हा समाज म्हणजे आदर्श ख्रिस्ती समाज होय असे त्याच्याकडे पाहणारे अनेक लोकही आहेत. आणि तरीही ह्या समाजव्यवस्थेचा आणि ख्रिस्ती धार्मिक श्रद्धेचा काही संबंध नाही. किंवा ख्रिस्ती म्हणून ओळखण्यात येणारे

आणि स्वतःला ख्रिस्ती मानणारे समाज गुलामगिरीची प्रथा पाळीत असत. पण तरीही या प्रथा, ह्या स्वरूपाचा सामाजिक व्यवहार यांचा ख्रिस्ती धार्मिक श्रद्धेशी काही संबंध नाही असे प्रामाणिकपणे म्हणता येते. किंबहुना ह्या गोष्टी ख्रिस्ती धार्मिक श्रद्धेशी विसंगत आहेत आणि म्हणून स्वतःला ख्रिस्ती म्हणविणाऱ्या समाजात त्या आढळून येत असतील तर ख्रिस्ती श्रद्धेच्या दृष्टीने त्या विकृती आहेत, श्रद्धावान ख्रिस्त्याने त्यांचे समाजातून निर्मूलन करण्यासाठी झटले पाहिजे अशीही भूमिका धारण करता येते.

ख्रिस्ती समाजाचा इतिहास पाहिला तर ख्रिस्ती श्रद्धेचा आणि मूल्यांचा राखणदार असलेल्या पुरोहितवर्गाने असा चिकित्सक आणि विद्रोही दृष्टिकोण सतत बाळगला होता आणि त्याला अनुसरून सामाजिक विषमतेविरुद्ध पवित्रा धारण केला होता असे दिसत नाही. पुरोहितवर्गाने त्या त्या युगात वरिष्ठ वर्गाशी व्यवस्थितपणे जुळवून घेतले होते, किंबहुना तो वरिष्ठ वर्गाचा भाग बनला होता असेच इतिहास सांगतो. परंतु कुणाही माणसाची अप्रतिष्ठा करणारी विषमता ही अमानुष आणि म्हणून असह्य अशी गोष्ट आहे आणि तिच्याशी जुळवून घेणे हे पाप आहे, तिचा प्रतिकार करणे हे आपले कर्तव्य आहे अशी मनोधारणा ज्या अनेक कारणांमुळे होऊ शकेल, त्यांत ख्रिस्ती धार्मिक श्रद्धा हेही एक कारण आहे. "सर्वच माणसे ह्या ईश्वराच्या प्रतिमा आहेत, एकाच पित्याची ती मुले आहेत आणि म्हणून भावंडे आहेत; तुम्हाला जो भाऊ दिसतो त्यावर जर तुम्ही प्रेम करीत नाही तर जो तुमचा पिता तुम्हाला दिसत नाही त्याच्यावर तुम्ही कसे प्रेम करणार ? आणि प्रेम करायचे तर तुम्हाला आपली सर्व संपत्ती वाटून टाकून निःसंग बनले पाहिजे", हे ख्रिस्ती श्रद्धेचे सार आहे. त्यातून सामाजिक समतेसाठी सामाजिक परिवर्तन करण्याची प्रेरणा मिळेलच असे नाही. पण मिळू शकेलही. पण प्रचलित विषम सामाजिक व्यवहाराच्या पलीकडे जाऊन सर्व माणसांच्या समान प्रतिष्ठेची कदर करण्याची प्रेरणा निश्चितच मिळेल. स्वतःच्या अंतःकरणात आणि इतर व्यक्तींशी करावयाच्या व्यवहारात विषमतेला यत्किंचितही थारा असणार नाही ह्याविषयी आपण सदैव जागरूक राहिले पाहिजे हे भान श्रद्धाळू ख्रिस्ती माणसाला बाळगावे लागेल.

हिंदू धार्मिक श्रद्धेची गोष्ट अशी नाही. चातुर्वर्ण्य ह्या श्रद्धेचा भाग आहे आणि चातुर्वर्ण्यात विषमता आहे. जोतिबा फुले यांच्यापासून समतावाद्यांची हिंदू धर्माविरुद्ध असलेली ही तक्रार आहे. म्हणून जोतिबांनी हिंदू धर्माच्या जागी 'सार्वजनिक सत्य धर्मा'ची स्थापना केली. समाज धर्मावर आधारता कामा नये, धर्मावरून समाजाला ओळखता कामा नये, धर्म ही वैयक्तिक श्रद्धेची बाब असली पाहिजे असेही जोतिबांचे म्हणणे होते व म्हणून एखाद्या कुटुंबात एक व्यक्ती ख्रिस्ती असेल, दुसरी महंमदी असेल... असे त्यांनी म्हटले आहे. पण एखादी व्यक्ती हिंदू असेल असे त्यांनी म्हटले नाही. कारण हिंदू धार्मिक श्रद्धा बाळगणे म्हणजे विषमतेला मान्यता देणे. आणि जर समता हे समाजधारणेचे मूलभूत तत्त्व असेल तर समतेशी विसंगत असलेली धार्मिक श्रद्धा बाळगण्याचा कुणालाही अधिकार नाही असे जोतिबांचे म्हणणे असेल.

दलित नेत्यांची हिंदू धार्मिक श्रद्धेविरुद्ध हीच तक्रार आहे. सामाजिक समतेचे तत्त्व मनापासून स्वीकारणारा कुणीही हिंदू धार्मिक श्रद्धा स्वीकारू शकणार नाही. तेव्हा जे स्वतःला समतावादी मानतात त्यांनी हिंदू धर्म सोडला पाहिजे आणि आपण तो सोडला आहे हे जाहीर केले पाहिजे असा त्यांचा आग्रह असतो. जे हिंदू हे पाऊल उचलत नाहीत त्यांच्या समतेवरील निष्ठेविषयी संशय बाळगायला जागा असते असे त्यांचे म्हणणे असते.

अनेकदा यापुढे जाऊन समतावादी हिंदूंनी बौद्ध धर्माचा स्वीकार करावा असेही आवाहन ते करतात. बौद्ध धर्म किंवा धम्म हा विवेकनिष्ठ धम्म म्हणजे वैयक्तिक व सामाजिक जीवनमार्ग आहे असे त्यांचे म्हणणे असते. जे प्रामाणिकपणे समतावादी आहेत त्यांना बुद्ध धम्मासारखा विवेकनिष्ठ

अनुक्रमणिका

समतावादी जीवनमार्ग उपलब्ध असताना ते विषमतावादी हिंदू धर्माला का चिकटून राहतात हे त्यांना पडलेले एक कोडे असते.

समतावादी मुसलमानांना बौद्ध धम्माचा स्वीकार करायचे आवाहन करताना ते आढळून यत नाहीत ही काहीशी विचित्र गोष्ट आहे. पण त्याचे एक कारण असे असेल की इस्लाम हा मूलतः समतावादी धर्म आहे ही गोष्ट ते मानतात. स्त्रियांविषयीची इस्लामी धर्मशास्त्राची भूमिका किंवा इस्लामने गुलामगिरीच्या प्रथेला दिलेली अनुज्ञा ही ह्या मूलत: समतावादी धर्माची स्खलने आहेत हे मान्य करूनही इस्लामी सिद्धांतांना पूर्णपणे समतावादी स्वरूप देता येण्याची शक्यता आहे; पण हिंदू धर्माच्या बाबतीत ही शक्यता अजिबात नाही असा हा विचार असावा. ह्या बाबतीतही ते जोतिबांचेच अनुकरण करीत आहेत असे दिसून येते. पण श्रुतिस्मृतींचे प्रामाण्य मान्य करणाऱ्या हिंदूला ज्याप्रमाणे चातुर्वर्ण्य अमान्य करणे शक्य होणार नाही, त्याप्रमाणे कुराण आणि हदिस यांचे प्रामाण्य मान्य करणाऱ्या मुसलमानालाही स्त्रियांना देण्यात येणारे कनिष्ठ स्थान, गुलामगिरीच्या प्रथेला देण्यात येणारी मान्यता ह्या इस्लाममधील आजच्या सद्सद्विवेकबुद्धीला अमान्य होणाऱ्या गोष्टी वर्ज्य करता येणार नाहीत. किंबहुना श्रद्धाळू मुसलमानाला इस्लाममध्ये सुधारणा करायला काही अवसर आहे हेच मान्य होणार नाही. शिवाय बौद्ध धम्म जर विवेकाधिष्ठित असा जीवनमार्ग आखून देत असेल तर तो सर्वच विवेकशील व्यक्तींसाठी प्रमाण असणार. तो स्वीकारण्याचे आवाहन जर मुसलमानांना करण्यात येत नसेल तर मुसलमानांच्या विवेकशीलतेविषयी संशय घेण्यात येत आहे असा त्याचा अर्थ होईल. आणि ही गोष्ट गैर तर आहेच, पण बौद्ध धम्माच्या पुरस्कर्त्यांच्या भूमिकेशी विसंगतही आहे. कारण जो प्रमाण जीवनमार्ग बौद्ध धम्म सर्व माणसांपुढे ठेवीत आहे, त्याचा मानवी समता हा गाभा आहे. ह्या निकषाला अनुसरून पाहता इस्लाम हा हिंदू धर्मापेक्षा अधिक विवेकशील आहे. कारण हिंदू धर्म विषमतेचा तत्त्व म्हणून स्वीकार करतो तर इस्लाम काही अपवादात्मक रूढी सोडल्या तर मानवी समतेचाच पुरस्कार करतो. तेव्हा विवेकाधिष्ठित धर्माच्या जवळ जाणाऱ्या इस्लामच्या अनुयायांना, तुम्ही आपल्या बऱ्याचशा विवेकाधिष्ठित असलेल्या धर्माचा त्याग परिपूर्णतेने विवेकाधिष्ठित असलेल्या धम्माचा स्वीकार करण्यासाठी म्हणून केवळ करा, असे आवाहन करणे तुलनेने सोपे असले पाहिजे. आणि ते फलद्रूप होण्याची शक्यताही अधिक असली पाहिजे. पण काही कारणाने असे आवाहन सामान्यपणे करण्यात येत नाही आणि ते केलेच तर ते परिणामकारक ठरेल अशी फारशी शक्यताही दिसत नाही. ही जोतीबांच्या पुढे असलेलीही अडचण होती. एकदा सार्वजनिक सत्य धर्माचे अवतरण झाल्यानंतर त्याच्याशी कोणत्याही बाबतीत विसंगत असलेल्या परंपरागत धर्माचे प्रयोजनच उरत नाही अशी भूमिका जोतीबांनी स्वीकारणे योग्य ठरले असते. पण ती त्यांनी स्वीकारली नाही. जोतीबा आणि बुद्ध धम्माचे पुरस्कर्ते यांनी हिंदू धर्माला असलेला पर्याय म्हणूनच आपापल्या धर्मांकडे पाहिले आणि हिंदू धर्म सुधारण्याच्या पलीकडे असल्यामुळे त्याच्या जागी वेगळ्या धर्माची स्थापना करणे त्यांना आवश्यक वाटले.

ते काही असो. जे समतावादी आहेत आणि स्वतःला हिंदू म्हणवून घेतात आणि स्वतःला हिंदू मानतात त्यांनी बौद्ध धम्माच्या पुरस्कर्त्यांच्या प्रश्नाचे उत्तर दिले पाहिजे. या प्रश्नाचे प्रामाणिक उत्तर म्हणून आधुनिक हिंदू असे म्हणू शकेल, "मी हिंदू आहे ही वस्तुस्थिती आहे. पण ह्या वस्तुस्थितीचा नेमका अर्थ काय ? हा अर्थ खरोखर मलाही माहीत नाही. मी हिंदू आहे याचा काहीसा अर्थ असा, की हिंदू धार्मिक-सामाजिक परंपरा पिढ्यानपिढ्या स्वीकारलेल्या कुटुंबात मी जन्माला आलो आणि वाढलो आणि याचे काही संस्कारही माझ्या मनावर झाले. पण मी विवेकशील व्यक्ती आहे. मी माझ्या समाजाच्या, कुटुंबाच्या परंपरेकडे, तिच्यात अनुस्यूत असलेल्या मूल्यांकडे चिकित्सक दृष्टीने पाहू शकतो आणि मी माझी मूल्ये स्वतंत्रपणे निश्चित करून स्वीकारू शकतो. ज्या समाजाचा मी घटक आहे,

अनुक्रमणिका

त्या समाजापुढे असलेल्या बिकट समस्यांचा हिंदू परंपरेशी काय संबंध आहे हे मला माहीत नाही. (एक तर मी स्वतःला केवळ हिंदू समाजाचा घटक मानीत नाही. हिंदू समाजाप्रमाणेच मी भारतीय समाजाचाही घटक आहे. शिवाय मी हिंदू समाजाचा घटक आहे आणि हिंदू समाज भारतीय समाजाचा भाग आहे आणि अशा संबंधपरंपरेने मी भारतीय समाजाचा घटक आहे असे मी मानीत नाही. मी सरळ भारतीय समाजाचा घटक आहे असेच मी मानतो.) ह्या समाजापुढे जे प्रश्न आहेत ते म्हणजे बहुसंख्य समाजाचे भयानक दारिद्र्य, त्याने चुरगळली जाणारी आयुष्ये, लोकांची असहायता, ज्यामुळे त्यांची मानवी प्रतिष्ठा कोलमडून पडते असा त्यांचा दुबळेपणा.

"हिंदू परंपरेची जी थोडी माहिती मला आहे– त्या परंपरेत वाढल्यामुळे झालेली माहिती– तिच्याप्रमाणे पाहता हे हिंदू परंपरेत उपस्थित झालेले आणि ह्या परंपरेने ज्यांची उत्तरे शोधायचा प्रयत्न केला असे हे प्रश्नच नाहीत. आणि इतर कोणत्याही धार्मिक परंपरेनेही हे प्रश्न सोडवायचे प्रयत्न केलेले नाहीत. वैयक्तिक दारिद्र्यामुळे दिङ्मूढ न होता त्याच्याशी कसा मुकाबला करावा, दारिद्र्यात आपले सत्व कसे टिकवून धरावे ह्या प्रश्नाचे उत्तर धर्मांनी दिले असेल. पण दारिद्र्य ही जी सामाजिक घटना आहे आणि जिचे इतिहासात होऊन गेलेल्या आणि आज जगत असलेल्या बहुसंख्य माणसांवर अमानुष परिणाम झालेले आहेत तिच्याशी कसा मुकाबला करावा, दारिद्र्याचे निर्मूलन करून सर्व माणसांना समाधानाने आणि प्रतिष्ठेने जगता येईल अशी परिस्थिती कशी निर्माण करावी या प्रश्नाचे उत्तर धर्मांनी शोधलेले नाही. हा हिंदू समाजापुढे आणि भारतीय समाजापुढे उपस्थित झालेला नवीन प्रश्न आहे.

"जेव्हा प्रश्नाचे उत्तर काय असेल ह्याची कल्पना करणे शक्य होते तेव्हाच प्रश्न उपस्थित होतो. वैज्ञानिक तंत्रज्ञानाने सर्व माणसांना समाधानाने जगता यावे यासाठी आवश्यक असलेली संपत्ती निर्माण करणे जेव्हा शक्य झाले तेव्हाच दारिद्र्याचे निर्मूलन हा व्यावहारिक प्रश्न झाला, आणि तांत्रिक दृष्ट्या जे शक्य आहे ते व्यवहारात का साधले जात नाही हा पुढचा प्रश्न उपस्थित झाला. ह्यांची उत्तरे शोधायचे जे मार्ग आहेत ते आधुनिक विज्ञान, सामाजिक ज्ञान, मानव्यविद्या यांनी उपलब्ध करून दिले आहेत. ह्या ज्ञानाच्या दृष्टिकोणातून मी हिंदू आणि भारतीय समाजाकडे पाहतो. हे आजचे प्रश्न समजून घेताना, त्यांची उत्तरे शोधताना आणि ही उत्तरे व्यवहारात उतरविताना मला हिंदू परंपरेचा आधार तर घ्यावा लागतच नाही; उलट अनेक व्यावहारिक अडचणींचे मूळ ह्या परंपरेत आढळून येते असाच माझा अनुभव आहे.

"तेव्हा एका अर्थाने ह्या परंपरेचा माझ्याशी संबंध उरला नाही आणि दुसऱ्या अर्थाने केवळ अडगळ म्हणूनच माझी आणि तिची मधून मधून गाठ पडत असते असे योग्य त्या विनयाने मला म्हणावेसे वाटते. तेव्हा मी कोणत्याही भरीव अर्थाने हिंदू राहिलेलो नाही.

"पण इतर धार्मिक परंपरांचेही असेच आहे. त्याही हिंदू परंपरेप्रमाणे कालबाह्य झालेल्या आहेत. तेव्हा मला हिंदू परंपरा सोडून दुसऱ्या धार्मिक परंपरेचा स्वीकार करायचे कारण नाही. एक तर हिंदू परंपरेचा त्याग करण्याचे मला कारण नाही, कारण ती गळून पडली आहे. आणि दुसऱ्या परंपरेचा स्वीकार करायचा प्रश्न नाही, कारण तिच्यात जे काही तथ्य असेल ते मला वैज्ञानिक ज्ञान आणि आधुनिक मानवतावादी मूल्यांच्या द्वारे मिळत असते. आणि ह्याच्या पलीकडे त्या परंपरेत जे काही असेल त्याच्याशी मी मुद्दाम संबंध कशासाठी जोडावा, हे मला कळत नाही.

"समजा, बौद्ध धम्म विवेकवादी जीवनमार्गाचा पुरस्कार करतो. एक विवेकवादी म्हणून मी ह्या जीवनमार्गाचा स्वीकार करीन. म्हणजे हा जीवनमार्ग विवेकशक्तीच्या निकषांना उतरतो म्हणून मी त्याचा स्वीकार करीन. तो बौद्ध धम्म आहे म्हणून करणार नाही. आता तुम्ही म्हणाल, की हा जो विवेकवादी जीवनमार्ग आहे तोच बौद्ध धम्म होय; बौद्ध धम्म हे विवेकवादी जीवनमार्गाचेच नाव आहे;

अनुक्रमणिका

विवेकाच्या कसोटीला उतरते तेच स्वीकारा अशी बुद्धाचीच शिकवण आहे. यावर मी एवढेच म्हणेन की 'नावात काय आहे ?' पण भगवान बुद्धांनी सांगितले आहे म्हणून विवेकाच्या कसोटीला उतरणाऱ्या गोष्टी मी स्वीकारतो असे नाही. मी त्या स्वीकारण्याचा निर्णय केला आहे. आणि भगवान बुद्धांनीही असेच आपण करावे असे जे सांगितले आहे त्याचा मला आनंद आहे आणि त्याबद्दल त्यांच्या विषयी मला आदर आहे."

अनेक हिंदू हे उत्तर प्रामाणिकपणे देतील. पण त्यामुळे बौद्ध मित्रांचे समाधान होईल असे नाही. हे वकिली चकवे उत्तर आहे असे त्यांना वाटेल. त्यांच्या मनांत येईल ते हे, की आम्ही "आम्ही बौद्ध का झालो ? आम्ही यापुढे विवेकवादी म्हणून आमच्या वैयक्तिक आणि सामाजिक जीवनाची आखणी करू एवढेच आम्ही का ठरविले नाही ? कारण आम्हाला एक नवीन अस्मिता (आयडेन्टिटी) पाहिजे होती. अस्पृश्य ही आमच्यावर लादण्यात आलेली आणि आमची प्रतिष्ठा हिरावून घेणारी, आमची अप्रतिष्ठा करणारी अस्मिता आम्हाला झुगारून द्यायची होती. पिढ्यानपिढ्या जी आमची धार्मिक परंपरा होती. आमचे वाडवडील ज्या परंपरेत जगले, जिला त्यांनी आपली परंपरा मानली आणि जिने त्यांची असह्य अप्रतिष्ठा केली त्या परंपरेविरुद्ध आम्हाला विद्रोहाचे रणशिंग फुंकायचे होते. ह्या विद्रोहात तुम्ही आमच्या सोबत आहात की नाही ? तुम्ही आहात असे तुम्हाला म्हणायचे आहे. पण त्याचा पुरावा काय ? ज्या परंपरेने आमची माणुसकी हिरावून घेतली तिच्यावर तुम्ही आपली अस्मिता आधारता, स्वतःला हिंदू म्हणता आणि म्हणवून घेता; तेव्हा तुम्ही न्यायाच्या, समतेच्या. मानवी प्रतिष्ठेच्या बाजूचे आहात हे आम्हाला पटेल तरी कसे ? "

समंजस हिंदूंचे या प्रश्नाला उत्तर काय राहील ? कदाचित त्यांच्या मनात असे असेल, की "जशी हिंदू परंपरेने तुमची, दलितांची अप्रतिष्ठा केली आहे तशी पाश्चात्त्य देशांनी हिंदू समाजाची, भारतीय समाजाची अप्रतिष्ठा केली आहे. एक दुबळा, पौरुषहीन, कर्तृत्वहीन समाज म्हणून त्याला तुच्छतेने वागविले आहे. आज दलितांनी विद्रोह न करणे म्हणजे भ्याडपणा ठरेल असे तुम्हाला म्हणायचे आहे, हे मान्य करूया. पण तसेच हिंदूंनी स्वतःची अस्मिता नाकारणे हाही भ्याड पळपुटेपणा ठरेल. हिंदू ही आपली अस्मिता जाहीर करून आपले कर्तृत्व प्रस्थापित करण्यात आज हिंदूंचा पुरुषार्थ आहे. हिंदू परंपरेत जे दोष आहेत, ज्या अन्याय्य, अमानुष रूढी आहेत त्यांची जबाबदारी स्वीकारून ह्या परंपरेला नवीन वळण देण्याने हे कर्तृत्व सिद्ध होईल. तेव्हा तुमचा विद्रोह आणि आमची हिंदू अस्मिता ह्या एकाच ऐतिहासिक वारशाच्या दोन बाजू आहेत. तुमच्या विद्रोहाला आमच्या अस्मितेची साथ राहील. मग आपण संयुक्तपणे आणि समानतेच्या पायावर जो नवीन भारतीय समाज घडवू त्याच्यात प्रत्येक व्यक्तीच्या प्रतिष्ठेची कदर केली जाईल आणि ह्या समाजाचीही जगात कदर केली जाईल. कारण त्याने आपल्या जबाबदारीचे पालन करून आपली नैतिकता सिद्ध केली असेल.

"मग भारतीय म्हणून जेव्हा आपण आपल्या इतिहासाकडे पाहू तेव्हा आपणा दोघांना ह्या इतिहासात अभिमान बाळगण्यासारखे खूपच आहे असे दिसून येईल. आणि जे लाज बाळगण्यासारखे होते त्याचे किल्मिष मनात उरलेले नसेल, कारण ते आपण एकत्र येऊन धुऊन काढलेले असेल."



अनुक्रमणिका

## साभार पोच

* मंडल आयोग, अ. भा. मराठा महासंघ, मराठा समाजाची राष्ट्रीय भूमिका – द. स. दरेकर; बहुजन समाज जागृती प्रकाशन, २३१ गुरुवार पेठ, पुणे ४११ ००२; १९८४; पृ. ८४; किंमत १० रुपये.

* शोध सावरकरांचा – य. दि. फडके; श्रीविद्या प्रकाशन; २५० शनिवार पेठ, पुणे-३०; १९८४; पृ. १९८; किं. ३५ रुपये.

* रथ (कादंबरी) – रंगनाथ पाठारे; ग्रंथाली प्रकाशन, ३४/९०२, नेहरूनगर, मुंबई-२४; १९८४; पृ. १४२; किं. १८ रुपये.

* गांधी – नलिनी पंडित, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई-२४; १९८३, पृ. २७२; किं. ३५ रुपये.

* मोहोळ (कादंबरी) – रवी मिश्रा; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई-२४; १९८३; पृ. १८६; किं. १८ रुपये.

* वैद्यकसत्ता – आनंद नाडकर्णी; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई-२४; १९८३; पृ. ११९; किं. १५ रुपये.

* कामरंग – डॉ. लीना मोहाडीकर; ग्रंथाली प्रकाशन, मुंबई – २४; १९८३; पृ. २०६; किं. २० रुपये.

* मंथन (राजभाषा वर्षातील वैचारिक लेखांचे संकलन) – प्रकाशक : भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई– ४०० ०३२; १९८३; पृ. ११५; किं. १३ रुपये.

* दिशा आणि दृष्टी (लेखसंग्रह) – बा. ह. कल्याणकर; युगकर्ता प्रकाशन, १३ शिवनेरी, सेक्टर एफ्. एन्. ५, सिडको, औरंगाबाद; १९८३; पृ. १००; किं. २० रुपये.

* जनसाहित्य संमेलन विशेषांक १९८४ – संपादक मनोहर तल्हार, प्रकाशक सरचिटणीस, अखिल भारतीय जनसाहित्य समेलन, धनवटे नॅशनल कॉलेज, नागपूर; १९८४; पृ. १४४; किं. १५ रुपये.

० ० ०

### लेखकांना विनंती

साहित्य कागदाच्या एका बाजूला, सुवाच्य अक्षरात आणि
मराठी साहित्य महामंडळाच्या शुद्धलेखनाच्या नियमांनुसार असावे.
नापसंत साहित्य परत पाहिजे असल्यास
सोबत पुरेसे टपालहशील असणे आवश्यक आहे.

अनुक्रमणिका

# धर्मसमीक्षेची प्रस्तावना*

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

फ्रेंच इहवादी सामाजिक तत्त्ववेत्ता कोंत याच्या मते मानवसमाज जसजसा प्राथमिक अवस्थेपासून आतापर्यंत विकास पावत गेला त्याप्रमाणे मानवी विचारपद्धतीच्या तीन श्रेणी क्रमाने विकास पावल्या. पहिली म्हणजे धर्मप्रधान विचारसरणी, त्यानंतरची अधिक प्रगत परतत्त्वप्रधान विचारसरणी आणि तिसरी विज्ञानप्रधान विचारसरणी. धर्मप्रधान विचारसरणीमध्ये जीवन आणि विश्व यांमध्ये निसर्गातील अशा शक्तीचा किंवा देवदेवता, पापपुण्य इत्यादी प्रकारच्या शक्तींचा आत्यंतिक प्रभाव असतो. व्यापक अशी बुद्धिगम्य सामान्य परम तत्त्वे विश्वाला व जीवनाला व्यापून असतात. ती तत्त्वेच किंवा त्या तत्त्वांचा समुदाय किंवा एकच परमतत्त्व हेच खरे सत्य होय, अशा विचाराचा प्रभाव वाढून धार्मिक विचाराला त्या तत्त्वज्ञानामधला एक विभाग म्हणून स्थान प्राप्त होते. प्रत्यक्ष अनुभव आणि प्रयोग यांच्या योगाने विश्वातील आणि जीवनातील घटनांचा अर्थ समजण्यास मार्गदर्शक अशी यापुढील विज्ञाननिष्ठ विचारसरणी होय. यामध्ये प्रत्यक्ष वस्तुनिष्ठ सामान्य गृहीतके मनुष्याची बुद्धी सिद्ध करते. तेव्हा धार्मिक आणि सामान्य परम तत्त्वज्ञानात्मक विचारसरणी दुय्यम ठरू लागते. धार्मिक विचारसरणी मागे पडते, तात्त्विक विचारसरणी दुय्यम ठरते आणि प्रत्यक्ष वास्तवाला महत्त्व देणारे विज्ञान हे विचारसरणीच्या सर्वश्रेष्ठ स्थानावर विराजमान होते; असा कोंत याच्या या वैचारिक विचारपद्धतीचा निष्कर्ष सांगता येतो. कोंतनंतर गेल्या दीडशे वर्षांत सांस्कृतिक मानवशास्त्राचे विशेष सखोल असे संशोधन झाले असून जगातील प्राथमिक अवस्थेपासून तो अद्ययावत विकसित अवस्थेपर्यंत पोचलेल्या मानवी समाजांचा अभ्यास झालेला आहे. त्यावरून कोंतच्या वरील निष्कर्षाचा काहीशा मर्यादित अर्थानेच स्वीकार करावा लागतो.

धार्मिक श्रद्धा ही मानवी मनातील गुंतागुंतीची, पण समर्थ अशी प्रवृत्ती आहे. मानवी मनाचा धार्मिकतेकडे विलक्षण असा स्वाभाविक ओढा असतो, असे लक्षात येते. किंबहुना मानवी स्वभावाचा धर्मभावना हा दुर्दम्य असा भाग दिसतो. बुद्धिप्रामाण्यवादाला यूरोपमध्ये अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांत मोठा भर आला. त्यात हर्बर्ट स्पेन्सरसारखे अज्ञेयवादी तत्त्वज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ मान्यता पावले. एमिल दुरखाइमसारखे अज्ञेयवादी म्हणू लागले, की धार्मिक धर्मकांड आणि धार्मिक आचार म्हणजे मानवी सामुदायिक जीवनाचे दृढीकरण करण्याची पद्धती होय. ही पद्धती मानवी जीवनाचे केंद्र बनली आहे. विसाव्या शतकात धर्मविरोधी समाजवादी राज्ये निर्माण झालेली आहेत; त्या राज्यांमध्येसुद्धा धर्मसंस्था आपली पाळेमुळे खोलात रुजवून अढळपणे, बेमालूमपणे समर्थ जीवन जगत आहे. दोन लाख वर्षांपूर्वीच्या निअंडरथल मानवगणामध्येसुद्धा मृताच्या दफनाचे कर्मकांड चालू होते, असे दिसून येते. इराकमधील शालिंगार येथे ६० हजार वर्षांपूर्वीचे थडगे

* प्राज्ञपाठशाळा मंडळाच्या पुस्तकमालेने तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी लिहिलेली दोन पुस्तके १) हिंदुधर्माची समीक्षा व २) सर्वधर्मसमीक्षा नुकतीच एकत्रित प्रसिद्ध केली. पैकी 'हिंदुधर्माची समीक्षा' या पुस्तकाची ही तिसरी आवृत्ती व 'सर्वधर्मसमीक्षा' या पुस्तकाची ही पहिलीच आवृत्ती आहे. 'हिंदुधर्माची समीक्षा' हे १९४१ साली प्रथम प्रसिद्ध झाले होते. 'सर्वधर्मसमीक्षा'त समाविष्ट असलेली दोन व्याख्याने तर्कतीर्थांनी मुंबई विद्यापीठाच्या सेनापती बापट व्याख्यानमालेत १९७६ साली गुंफली होती. – संपादक

सापडले आहे. त्या थडग्यावर सात प्रकारच्या फुलांचे हार वाहिलेले पुरातत्त्ववेत्त्यांना सापडलेले आहेत. त्यांच्या मते तो त्या वेळच्या माणसांचा धर्मगुरू असावा. सांस्कृतिक मानवशास्त्रज्ञ अँथनी एफ्. सी. वॉलेस याचे मत असे आहे, की त्या अतिप्राचीन काळापासून आतापर्यंत लाखापर्यंत धर्मसंप्रदाय माणसाने निर्माण केलेले आहेत.

बुद्धिप्रामाण्यवादी नास्तिकांची किंवा भौतिकवाद्यांची अशी खात्री आहे, की विज्ञाननिष्ठ शिक्षणाच्या योगाने हे धार्मिक लोकभ्रमांचे जंजाळ साफ नाहीसे होऊ शकेल. या बुद्धिप्रामाण्यवाद्यांना असा भरवसा आहे, की वस्तुनिष्ठ ज्ञानसंग्रह यापुढे जसजसा वाढत जाईल त्या त्या प्रमाणात मनुष्यजात ही वाढत्या ज्ञानयुगाकडे आपली यात्रा अधिकाधिक वेगाने करू लागेल. यापुढे ज्ञानाचा उष:काल मानवी जीवनाच्या क्षितिजावर आक्रमण करीत राहील आणि संघटित धर्मसंस्थेचा अंधकार मागे मागे लोटला जाईल. परंतु हा आशावाद नजीकच्या काळात सफल होईल, अशी कल्पनाही करवत नाही. उदा., मनुष्यजातीच्या आतापर्यंतच्या इतिहासात युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका हे राष्ट्र विज्ञाननिष्ठ तंत्रज्ञानात आणि विज्ञाननिष्ठ शिक्षणपद्धतीत जगातील सगळ्या राष्ट्रांमध्ये पुढारलेले आहे. परंतु जगातील अत्यंत धर्मनिष्ठ राष्ट्रांमध्ये भारताचा क्रमांक पहिला लागतो आणि लगेच दुसऱ्या क्रमांकावर युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका दिसते. १९७७ साली अमेरिकेमध्ये या संदर्भात झटपट मतमोजणी (गॅलप पोल) करण्यात आली. त्यात असे आढळून आले, की ९४% अमेरिकन नागरिकांचा धर्मावर किंवा एक प्रकारच्या पारलौकिक शक्तीवर विश्वास आहे. या ९४% टक्के नागरिकांपैकी ३१% नागरिकांना कल्पना नसताना एकदम धार्मिक प्रकाशझोत किंवा दिव्य संवेदना झपाटून गेली. १९७५ साली बिली ग्रेहॅम या धर्मोपदेशकाच्या 'देवदूत : देवाचे गुप्त संदेशवाहक' (Angels : God's secret Messengers) या पुस्तकाच्या आठ लाखांपेक्षा अधिक प्रती खपल्या.

रशियात म्हणजे सोव्हिएट युनियनमध्ये धर्मशिक्षणाला बंदी आहे. धार्मिक विषयाच्या पुस्तकांच्या आणि साहित्याच्या अथवा नियतकालिकांच्या प्रकाशनावर शासनाने कडक निर्बंध घातलेले आहेत. त्यांच्या देवळांमध्येच धर्मप्रवचन करता येते. इतके असूनदेखील व क्रांती होऊन ६५ वर्षे झाली तरी फार मोठ्या प्रमाणात तेथील नागरिक धार्मिक राहिले आहेत. कम्युनिस्ट पक्षाच्या सदस्यांपेक्षा दुप्पट नागरिक हे तेथील आर्थोडॉक्स चर्चचे सदस्य आहेत. सोव्हिएट युनियनची एकंदर लोकसंख्या २५ कोटी; त्यांतील ३ कोटी लोक ऑर्थोडॉक्स चर्चचे सदस्य आहेत. रोमन कॅथलिक, प्रॉटेस्टंट आणि इतर ख्रिश्चन संप्रदायांचे ७० लक्ष सदस्य आहेत. २५ लक्ष धर्मनिष्ठ ज्यू आहेत. सोव्हिएट मार्क्सवाद हा तिथला धर्मसंस्थेसारखा सुसंघटित, सरकारमान्य व त्यामुळे अनेक प्रकारच्या अनुकूलता असणारा संप्रदाय आहे; परंतु ख्रिश्चन धर्माला हा संप्रदाय बाजूला सारू शकला नाही. अनेक शतकेपर्यंत ख्रिश्चन धर्म हा तेथे स्थिरावला असून तो रशियन राष्ट्राचा आत्मा मानला जातो.

ऑगस्ट कोंत या फ्रेंच समाजशास्त्रज्ञाचा युक्तिवाद असा होता, की धार्मिक लोकभ्रमाचे प्रस्थ नष्ट होऊ शकेल; बुद्धिप्रामाण्यवादाच्या प्रभावाने या लोकभ्रमाची मुळेच उखडता येतील; त्याकरता इहवादी धर्माची ख्रिश्चन धर्माप्रमाणेच संघटना निर्माण करणे आवश्यक आहे. या इहवादी धर्मामध्ये देवाच्या ऐवजी समाजाची पूजा मोठ्या समारंभाने चालविणे आवश्यक आहे. वर्तमान काळी पश्चिमी राष्ट्रांमध्ये धर्मविरोधी विज्ञानाधिष्ठित मानवतावादी संघटना निर्माण झाल्या आहेत. त्या संघटनांमध्ये अनेक नोबेल पारितोषिकविजेतेही सामील झाले आहेत. धर्मविरोधी युक्तिवादांच्या तोफा मधूनमधून पोलादी कवचाचे गोळे या सर्वत्र पसरलेल्या धार्मिक दाट धुक्यातून फेकीत असतात. तरी देखील धार्मिक श्रद्धावंत या बुद्धिप्रामाण्यवादी विज्ञाननिष्ठांच्यापेक्षा कितीतरी पटीने या पश्चिमी समाजात स्वस्थपणे निर्वेध धार्मिक जीवन जगत आहेत.

दयाळू धार्मिक संप्रदाय आणि विवेकबुद्धिनिष्ठ इहवादी संप्रदाय यांच्यामध्ये अविरोध आणि सुहृदभाव निर्माण करणारे काही सद्भावनेचे विद्वान प्रयत्न करीत आहेत. २५० वर्षांपेक्षा अधिक

काळ विज्ञानयुगाचा वरिष्ठ प्रवर्तक न्यूटन याने दोन पवित्र पुस्तके विद्वानांनी वाचावी असा सल्ला दिला. ती पुस्तके म्हणजे निसर्गसृष्टी आणि मनुष्यप्रणीत पवित्र धर्मग्रंथ. स्वतः न्यूटनने विश्वाचे गतिविज्ञान सांगितले. ती गती विश्वाच्या आरंभी देव सुरू करतो व नंतर निरंतर आपोआप सुरू राहते. त्यामध्ये ईश्वर हस्तक्षेप करीत नाही व चमत्कार होत नाहीत. न्यूटननंतर झालेले भौतिकी गणिताचे अनेक विद्वान म्हणू लागले, की अणुद्रव्याला प्रेरणा देणारा कोणी असावा, असे मानण्याची गरज नाही. परंतु अजूनही काही भौतिकीचे संशोधक अणूच्या पोटातील कणांना प्रेरित करणारा आणि कोटयवधी किंवा अब्जावधी सूर्यमालांना जन्म देत असलेल्या आणि भविष्यकालीही जन्म देऊ शकणाऱ्या तेजोमेघांना प्रेरित करणारा अंतःस्थ देव आहे, असे मानतात. अणुरचनेच्या गुणांचा अभ्यास करणाऱ्या तत्त्ववेत्त्यांना आणि वैज्ञानिकांना असे वाटते, की अंतःस्थ नारायणामुळे अणुरूप संघटणा कणांना जन्म देते; कणांपासून सजीव घटना निर्माण होतात; सजीव घटनेमध्ये मन प्रकट होते. मन हे काय आहे, हे अजून कळायचे आहे. या सर्वांत देवाचा हात कुठेतरी दिसतोच. जे अजून उलगडत नाही किंवा केव्हाही उलगडणार नाही असे वाटते. तेथे देवच असावा असे वाटू लागते; त्यामुळे मनाला शांती लाभते. मन हा देवाचा चमत्कार आहे; एकंदर विश्वच हा देवाचा चमत्कार आहे; अशी खोल जाणीव उत्पन्न होते आणि मन नम्र होऊन हात जोडते. मात्र हा विज्ञान आणि धर्म यांचा समन्वय परंपरागत धर्मापेक्षा अगदी वेगळा आहे. यातून कसलेही कर्मकांड निघत नाही. यज्ञ किंवा पूजा, धर्मगुरू आणि त्यांची अनुशासने, मठ आणि देवालये, ग्रंथपठन, भजन, कीर्तन, उपदेश वगैरे काहीही यात समाविष्ट होऊ शकत नाही. त्यामुळे धार्मिक कर्मकांड चालवणारा धर्मोपदेशक पुरोहितवर्ग अस्तित्वात असण्याची गरज सिद्ध होत नाही. ही विज्ञानाला आवश्यक वाटणारी धार्मिक विचारसरणी पवित्र पुराणकथांवर आधारलेली नाही. या पुराणकथा निरनिराळया राष्ट्रांमध्ये आणि समाजांमध्ये वेगवेगळया असतात. त्यामुळे भिन्न धर्मसंस्था अस्तित्वात येतात; धर्मसंस्था चालविणारे पुरोहितवर्गही वेगवेगळे निर्माण होतात. त्यांच्यामध्ये लोभमूलक स्पर्धा सुरू होते. सगळया पुरोहितवर्गांच्या गरजा समानच असतात. जितक्या गरजा समान तितकी स्पर्धाही जोरदार असते. त्यामुळे भिन्न भिन्न धर्म स्पर्धेमध्ये अहमहमिकेने आपआपली सत्ता वाढविण्याचा प्रयत्न करतात व त्यामुळे अत्यंत असहिष्णू बनतात.

भिन्नभिन्न धर्मांमधील स्पर्धा ही वैचारिक स्पर्धा न राहता द्वेष आणि लोभ ह्या विकारांचा क्षोभ होऊन तिची हिंसक स्पर्धेमध्ये जेव्हा परिणती होते, तेव्हा स्पर्धाशील धर्मसंघटना ह्या अनैतिक व जुलमी बनतात. सर्व प्राण्यांचा सुहृद दयामय सर्वज्ञ ईश्वर किंवा प्राणिमात्रांबद्दल व मनुष्यमात्रांबद्दल सहानुभूती व करुणा यांनी भरलेला, केवळ उपदेशानेच तारक तत्त्व शिकविणारा प्रेषित, सर्वज्ञ मुनी किंवा संत हेच नैतिक शुद्ध मूल्य आणि पावित्र्य धर्मसंस्थेमध्ये निर्माण करू शकतात. परंतु धर्माच्या इतिहासात असे दिसते, की धर्मसंस्थांमधून असा ईश्वर वारंवार अदृश्य होतो आणि असे प्रेषित, मुनी वा संतही दीर्घकालपर्यंत गुप्त होऊन जातात. आपल्यापेक्षा भिन्न विचारसरणींबद्दल असहिष्णू व कठोर असे प्रेषित वा संत पुढे येतात. त्यांच्यामुळे धर्मयुद्धे निर्माण होतात. ही आपत्ती टाळण्याकरिता व्यापक शुद्ध नैतिक मूल्यांच्या कसोटीवर धर्मसंस्थांचा इतिहास तपासून विद्यमान सर्व धर्मसंस्थांची नवी रचना करणे ही आजच्या जागतिक मानवसमाजाची गरज आहे. जागतिक मानवसमाजाच्या चिरंतन स्वास्थ्याकरिता, जगातील विद्यमान धर्मसंस्थांमधला मत्सर, द्वेष आणि हिंसक स्पर्धा नष्ट करण्याकरता धर्मसंस्थांमधील परंपरागत वारशाने आलेले अत्यंत सत्य आणि पवित्र म्हणून जपलेले, भ्रांत विचारांनी भरलेले पवित्र धर्मग्रंथच विवेकबुद्धीने समीक्षिले पाहिजेत. कारण बुद्धी हीच वरिष्ठ व अखेरची न्यायदेवता होय.

धार्मिक विचार हे मनुष्याच्या स्वभावातच अपरिहार्यपणे भरलेल्या अंतःप्रेरणा आणि भावनांवर आधारलेले असतात, असे परंपरागत रूढ धर्मांचे समर्थक सांगत असतात. हे सांगत असताना ते जगातील धर्मपरिवर्तनाचा इतिहास लक्षात घेत नाहीत. मनुष्यबळी देण्याची प्रथा प्राथमिक धर्मांमध्ये प्रच-

लित होती व अजूनही काही प्राथमिक मागासलेल्या आदिवासी समाजांमध्ये ही मनुष्यबळीची प्रथा सुधारलेल्या कायद्याचा डोळा चुकवून कित्येक वेळा आचरणात आलेली दिसते. भूत–प्रेत–पिशाच यांची पूजा करणाऱ्यांच्याही मनामध्ये भावना असतातच. अशा प्रकारच्या भावनांचा वा माणूस, पशु–पक्षी इत्यादी प्राण्यांना देवपूजेत बळी देणाऱ्यांच्या भावनांचाही आदर करावा काय, याचा विचार भावनावाद्यांनी करावयास पाहिजे. मानवसमाजातील भेदभाव, विद्वेश आणि हिंसक संग्राम यांना ज्या भावना चेतवितात, त्या भावनासुद्धा धार्मिक भावना म्हणून स्वीकारल्या तर धर्म ही संस्था मानवी समाजाची एक अधःपात करणारी संस्था आहे असेच मानले पाहिजे. भावना म्हणजेच श्रद्धा. या श्रद्धांचे प्रकार व उच्च–नीच मूल्ये विवेकबुद्धीने तपासण्याची गरज आहे. त्याकरिता परंपरागत पवित्र धर्मग्रंथ मदत करतीलच असे नाही; कारण धर्मग्रंथांमध्ये मानवी मनातील हीन, विकृत भावना आणि भ्रांत श्रद्धांचे आविष्कारही शिरलेले असतात.

परंतु या दृष्टीने हिंदू धर्मातील धार्मिक तत्त्वज्ञान धार्मिक विग्रहातून मानवी समाजांना मुक्त करणारा दृष्टिकोन स्पष्ट रीतीने मांडते. धर्मसंप्रदायांचे आपसातील हिंसक विग्रह टाळण्याचा आणि शेजारधर्माने चिरकाल शांतिमय जीवन जगण्याचा प्रयोग यशस्वी रीतीने हिंदू समाजाने केलेला आहे, असे हिंदू धर्माचा इतिहास सांगतो.

वर्तमान जागतिक धर्माचा इतिहास पाहिला तर त्यात दोन परस्परविरोधी प्रवृत्ती स्पष्ट दिसतात : १) परंपरागत धर्मसंस्थांना नष्ट करून स्वतःचे राज्य स्थापन करणारे धर्म. उदा., ख्रिश्चन धर्म वा इस्लाम. २) परंपरागत धर्मसंस्थांना समाविष्ट करून त्यांच्यावर उदार भावनांचे संस्कार करणारे धर्म. उदा., बौद्ध, वैदिक, शैव, वैष्णव किंवा हिंदू धर्मात समाविष्ट झालेले अनेक परंपरागत तत्त्वज्ञाननिष्ठ धर्म. बौद्ध धर्म भारताबाहेर पूर्व आशियामध्ये जपानपर्यंत पसरला. भारताच्या उत्तरेत आणि मध्य आशियात पसरला; परंतु तेथील परंपरागत धर्माशी जुलूम–जबरदस्तीचा व्यवहार बौद्धधर्माने केला नाही. शैव धर्म हा वेदपूर्वकालीन धर्म. वैदिकांनी शिव हा महेश्वर म्हणून पूजिला. अजूनही शिवाचा प्रभाव भारताच्या पूर्व-पश्चिम व उत्तर-दक्षिण सीमांपर्यंत स्थिरावलेला आहे. पांचरात्रागमाने प्रवृत्त केलेला विष्णु–राम–कृष्णांचा पूजक वैष्णव धर्म प्रथम वेदप्रामाण्य नाकारून उभा राहिला. हा वैष्णव धर्म वैदिकांनी स्वीकारला आणि हिंदू धर्मात समाविष्ट झाला. शक्तिपूजक किंवा देवीपूजक शाक्त संप्रदाय हा मूळचा मातृदेवतेचा पूजक वेदपूर्वकालीन धर्म आहे. हा अतिप्राचीन काळी जगाच्या सगळ्या सुसंस्कृत जाति–जमातींमध्ये प्रचलित होता असे सांस्कृतिक मानवशास्त्र सांगते. तो वैदिकांनी आत्मसात केला. वैष्णव धर्मातील आणि शैव धर्मातील प्रसिद्ध असे दोन प्रार्थनाश्लोक आहेत. त्यांमध्ये ही सर्वसमावेशक तत्त्वनिष्ठ भावना उत्कृष्ट रीतीने व्यक्त झाली आहे. ते असे—

यं शैवाः समुपासते शिव इति ब्रह्मेति वेदान्तिनो
बौद्धा बुद्ध इति प्रमाण पटवः कर्तेति नैयायिकाः ।
अर्हन्नित्यथ जैन शासनरताः कर्मेति मीमांसकाः
सोऽयं वो विदधातु वांछितफलं त्रैलोक्यनाथो हरिः ॥

अर्थ :– शैव शिव म्हणून, वेदान्ती ब्रह्म म्हणून, बौद्ध बुद्ध म्हणून, प्रमाणविद्येचे पंडित नैयायिक विश्वकर्ता म्हणून, जैन अर्हत् म्हणून आणि मीमांसक कर्म म्हणून ज्याची उपासना करतात, तो त्रैलोक्याचा स्वामी हरि वांछित फल प्राप्त करून देवो !

त्रयी सांख्यं योगः पशुपतिमतं वैष्णवमिति
प्रभिन्ने प्रस्थाने परमिदमदः पथ्यमिति च ।
रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथजुषां
नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव ॥

अर्थ :– वेद, सांख्य, योग, शैव, वैष्णव असे भिन्न-भिन्न मार्ग आहेत; त्या त्या मार्गातील लोक 'हा सर्वांत हितकर' किंवा 'तो सर्वांत हितकर' म्हणून रुचिभेदास्तव सरळ किंवा वक्र नाना मार्गांचा स्वीकार करतात. निरनिराळे जलप्रवाह जसे समुद्रात जाऊन मिळतात, त्याप्रमाणे ही सर्व माणसे तुझ्याकडेच येत असतात.

भगवद्गीतेने जगातील सर्व धार्मिक उपासनांना वरील स्तोत्रांत सांगितल्याप्रमाणे मान्यता देऊन विवेकबुद्धीचा निकषही लागू केलेला आहे. भगवद्-

गीतेने सांख्य तत्त्वज्ञानाचा समावेश करून विश्वात्मक आणि विश्वातीत अशा पुरुषोत्तम भक्तीचा अंतिम सिद्धांत सांगितला आहे. अन्य देव–देवतांची उपासना करणारे देखील त्या पुरुषोत्तमाचीच उपासना करतात असे सांगून भिन्न धार्मिक संप्रदायांच्या विग्रहाचे बीजच नष्ट केले आहे.

भगवद्‌गीतेनें प्राथमिक धर्म व धर्मसंस्था यांपासून तो उच्चतम धर्म आणि धर्मसंस्था यांचे तत्त्वज्ञान सांगून मूल्यमापनाचे निकषही सांगितले आहेत. शास्त्रविधीप्रमाणे होणारे धार्मिक वर्तन आणि शास्त्रविधी उपेक्षून केलेले धार्मिक वर्तन या दोन्ही वर्तनांच्या सांख्य तत्त्वज्ञानाच्या आधारे उच्च, मध्यम आणि नीच अशा प्रती ठरविणारा निकष सांगितला आहे, तो म्हणजे गुणत्रय. सत्त्व, रजस् आणि तमस् हे गुण धर्मवर्तनात दिसतात. देहधाऱ्यांच्या मध्ये स्वभावत: तीन प्रकारची श्रद्धा असते; सात्त्विक, राजस व तामस. सात्त्विक श्रद्धा, सर्वव्यापी तत्त्वाच्या प्रकाशात आत्मा आणि बुद्धी यांच्या प्रसन्नतेला कारण होणाऱ्या ज्ञानातून निर्माण होते. त्यात सर्वभूतहितबुद्धी असते. राग, द्वेश, अहंकार यांतून मुक्त असे मन त्या श्रद्धेतून व्यक्त होते. राजसी श्रद्धेतून उत्पन्न झालेल्या धार्मिक वर्तनात परोपकार घडतो; पण त्यात प्रत्युपकाराची अपेक्षा असते. सार्वत्रिक आत्मौपम्य बुद्धी नसते. दंभ वा अहंकार त्यात असू शकतो. आपपरभाव असतो. तामस् श्रद्धेने झालेले धर्माचरण अज्ञानमय असते. त्यात अतत्त्वच तत्त्व म्हणून बुद्धीला भासते. तात्पर्य जे जे कर्म सार्वत्रिक आत्मौपम्य बुद्धीने घडते तोच धर्म होय. सर्व प्राण्यांचा मित्र परमेश्वर आहे हे ज्याला समजते तोच परमेश्वराला प्रिय होतो; असा ईश्वर ज्या ज्या धर्माने पूजिला आहे तोच धर्म श्रेष्ठ होय, असा भगवद्‌गीतेचा अभिप्राय आहे. सार्वत्रिक मैत्रीचा संदेश ज्या धर्मातून मिळत नाही तो भगवद्‌गीतेच्या दृष्टीने हीन धर्म होय. सर्वधर्मांचा महासमन्वय करणारे तत्त्वज्ञान प्रथम भगवद्‌गीतेने सांगितले आहे. त्यानंतर अद्वैत वेदान्तामध्ये त्याचा निराळ्या पद्धतीने पुरस्कार केला आहे. अद्वैत तत्त्वज्ञान इतर कोणत्याही तत्त्वज्ञानाचा विरोध करीत नाही, असे आचार्य गौडपाद यांनी 'मांडूक्यकारिका' या ग्रंथात प्रतिपादिले आहे.



# मालाकार व फुले

रा. ना. चव्हाण

गेल्या वर्षी निबंधमालाकार चिपळूणकर यांच्या निधनाला शंभर वर्षे १७ मार्च रोजी पुरी झाली. यासंबंधाने त्यांचे विशेष स्मरण करणे, हे एक कर्तव्य वाटते. त्यांच्या विचारांचे ध्येय व पाया समजून घेण्यासाठी 'मालाकार व फुले' हा (विवाद्य) विषय येथे निवडला आहे.

या लेखासाठी हरि रघुनाथ भागवत यांनी संपादित केलेल्या चित्रशाळेच्या दुसऱ्या आवृत्तीचा उपयोग केला आहे, व जरूर तेथे पृष्ठांक दिले आहेत.

फुले यांनी सामाजिक स्वातंत्र्याच्या प्रेरणा दिल्या व मालाकारांनी नवी राजकीय जागृती केली.

सत्यशोधक समाजाचा रिपोर्ट व आणखी दोन दुसऱ्या लेखकांची मराठी पुस्तके अभिप्रायार्थ मालाकार यांच्याकडे पाठविण्यात आली, त्यांवर संपादक या नात्याने चिपळूणकरांनी मालेच्या ४४ व्या अंकात परीक्षणे प्रसिद्ध केली. मालाकार व फुले हे समकालीन असल्यामुळे सत्यशोधक समाजाच्या रिपोर्टाचे त्यांनी जे कठोर परीक्षण केले आहे, त्यावरूनही हा मूळ समाज, त्याचे संस्थापक व त्यावेळचा काळ, यांच्यासंबंधी साधार माहिती प्राप्त होऊ शकते व हे एक महत्त्वाचे साधन कसे ठरते, हे येथे दर्शवावयाचे आहे. मालाकार यांनी उपहासगर्भ भाषा फार करून वापरली आहे. तरी ह्यातून काही भाग निवडला तर (आद्य) सत्यशोधक समाज म्हणजे काय ? याचे उत्तर मिळते. उदा., "हल्ली आपल्या देशात जिकडे पाहावे तिकडे खेड्यापाड्यांतून सुद्धा समाज व सभा स्थापन होत असल्याचे वरचेवर ऐकू येते." ज्या काळात विष्णुशास्त्री निबंधमाला चालवीत होते, त्यावेळी इंग्रजांनी जिंकिलेल्या हिंदुस्थानात–महाराष्ट्रात व खुद्द पुण्यात–सामाजिक–धार्मिक (Socio–Religious) व राजकीय जागृतीची परिस्थिती कशी होती, हे निबंधमालेवरून समजते. फुले व विष्णुशास्त्री चिपळूणकर दोघेही पुणेकर, दोघेही ग्रंथकार–निबंधलेखक, इतिहास व वर्तमानांतील घटनांची चिकित्सा करणारे झाले. दोघांनाही राजकीय, सामाजिक व धार्मिक दृष्टिकोन (पक्ष) होता. जोतीराव एक ग्रंथकार म्हणून न्या. मू. रानडे यांच्या नेतृत्वाखाली भरलेल्या पहिल्या ग्रंथकार परिषदेचे आमंत्रण जोतीरावांना पाठविले होते. चिपळूणकर व फुले या अव्वल इंग्रजीतील दोन मराठी लेखकांचा बहुतेक सर्व वाङ्मय–इतिहासकारांनी परिचय करून दिलेला आढळतो. फुले हे मालापूर्व वाङ्मयसेवकांत मोडतात; व ते वयाने चिपळूणकरांच्या पेक्षा ज्येष्ठही होते. दोघेही प्रथम शिक्षक होते व दोघांनीही पुण्यास शाळा काढल्या. नंतर दोघेही लेखक, लोकशिक्षक व संपादक झाले. 'निबंधमाला' नावाचे नियतकालिक प्रथम बाबा पदमणजी यांनी काढले. ते बंद पडल्यावर चिपळूणकरांनी स्वतःची 'निबंधमाला' काढली. नावापुरते तरी अनुकरण झाले. बाबा पदमणजी व त्यांचे मित्र यांच्यावर चिपळूणकर नाखूष होते. जोतीबा व पुणे-वर्णनकार (कै. वि. ना. जोशी) हे बाबा पदमणजी यांचे मित्र होते. सत्यदीपिकाकर्ते बाबा पदमणजी, 'घाशीराम कोतवाल' ही कादंबरी लिहिणारे मोरोबा कानोबा (स्मॉलकॉज कोर्टाचे जज्ज) व 'पुणे वर्णन'कर्ते जोशी व जोतीबा निबंधमालाकर्त्यांच्या उपहासाचे एकत्र विषय झाले. 'घाशीराम कोतवाल' व 'पुणे वर्णन' यांची जातकुळी चिपळूणकरांनी एकच समान ठरविली आहे. वरील सर्वांवर (व गुलामगिरी ह्या जोतीरावांच्या पुस्तकावरही) मालाकारांची टीका का झाली ? याचे सूत्र निबंधमालेतील पुढील संदर्भ सांगणाऱ्या काही वाक्यांवरून चिपळूणकर यांच्या शब्दांतच सांगता येते– "...शहाणपणा काय तो इंग्रजांत ! फार तर काय, पण जे मुसुलमान अजूनही अक्षरशून्य, मंद असे सर्वत्र प्रसिद्ध आहेत त्यांचे सुद्धा

अनुक्रमणिका








ज्ञान आपल्या लोकापेक्षा विशेष दाखविले आहे" 'घाशीराम कोतवाल' ह्या कादंबरीचा परिचय करून देताना इतिहास ह्या निबंधात चिपळूणकरांनी हे मत प्रगट केले आहे. 'घाशीराम कोतवाल' ह्या कादंबरीचे नाटक रंगभूमीवर आल्यावर नुकताच महाराष्ट्रात गहजब झाला! पण पहिला मोठा विरोध चिपळूणकरांनी केला. चिपळूणकरांना मराठी पेशवाईचा अभिमान होता.

'पुणे वर्णन' कर्ते जोशी यांचे पुस्तक सन १८६८ साली निघाले. सहासात वर्षांनंतर चिपळूणकरांनी ह्या पुस्तकाचा 'घाशीराम कोतवाल' याचेच एक भार्वंड म्हणून परामर्ष घेतला. कै. जोशी यांच्या संबंधाने आजही माहिती फारच अल्प उपलब्ध आहे. "यांची विशेष माहिती आम्हास बिलकूल नाही" असे खुद्द चिपळूणकर लिहितात. "पण त्यांच्या प्रस्तुतच्या ग्रंथावरून हे मिशनरी लोकांच्या हाताखाली शिकले असून त्यांचा उपदेश मनात पूर्ण बिंबलेल्या शिष्यवर्गापैकी आहेत हे स्पष्ट दिसते" असे चिपळूणकर स्वतः पुढे लिहितात (पृ. ८६). जोतीराव व जोशी यांची मैत्री होती, एवढे म्हणता येईल.

प्रसिद्ध संशोधक श्री. य. दि. फडके यांच्याशी विचारविनिमय करण्याचा प्रसंग एकदोन वर्षांपूर्वी प्रस्तुत लेखकास आला होता. त्या वेळी सन्माननीय फडके यांच्याकडून समजले की, हे जोशी ख्रिस्ती झाले होते. चिपळूणकर फक्त "जोशी हे ख्रिस्ताळलेले होते, एवढीच मजल मारतात". ख्रिस्ती मिशनरी व देशी ख्रिस्ताळलेले मग ते कोणीही असोत, चिपळूणकरांच्या टीकेस पात्र झाले.

'पुणे वर्णन' पुस्तकासंबंधी येथे एवढे लिहिण्याचे कारण असे की, पुढे जोतीरावांची चिपळूणकरांनी जी ओळख करून घेतली व वाचकांना करून दिली, ती प्रामुख्याने 'पुणे वर्णन' व दुसरे खुद्द गुलामगिरी हे जोतीबांचे पुस्तक यांच्या आधारे होय. 'पुणे वर्णनाचे' वर्णन करीत असताना मालाकार लिहितात :– "... जगाचे खरे कल्याणकर्ते अकटोविकट ज्ञानसंपन्न असे मिचेल साहेब, गार्डनर साहेब व जोतीबा फुले प्रभृति त्यांचे सच्छिष्यमणि अशांच्या नावांनी आपल्या पुस्तकास पवित्र करून... इ." (पृ. ८८). पुण्याच्या ह्या वर्णनात जॉन मिचेल यांच्या शाळा व नंतरचे स्कॉटिश मिशनचे रेव्ह. मरे मिचेल, फुल्यांच्या शाळांना मदत करणारे गार्डनर रेव्ह. साहेब व जोतीबा यांच्या मुलीमुलांच्या–शूद्रातिशूद्रांच्या पुण्यातील पहिल्या शाळा यांची भरपूर माहिती प्राप्त होते; व 'पुणे वर्णन' हे जोतीबांच्या पूर्वचरित्राचे एक समकालीन महत्त्वाचे साधन मानावे लागते. फुल्यांचे चरित्रलेखक श्री. धनंजय कीर यांनाही व अनेकांना हे साधन उपयोगी झाले, व सर्वांना होत असते. कै. जोशी यांनी पुणे वर्णन लिहिताना बाबा पदमणजी यांचे साह्य घेतले. पदमणजी जाहीरपणे ख्रिस्ती झाले होते; वादच नाही. तरी विधवाविवाह वगैरे सामाजिक सुधारणुकीविषयी, त्यांना पूर्वी परमहंस सभेचे सदस्य असल्यापासून ओढा होता. दादोबा पाण्डुरंग, लोकहितवादी यांच्यापासूनचे राजारामशास्त्री भागवत यांच्या अखेरपर्यंतचे सर्वच समाजसुधारक व पदमणजी यांचा स्नेह होता. जोशी वि. ना. व जोतीराव यांचाच पदमणजीशी स्नेह व मैत्री होती असेच नव्हे; व जोतीराव व जोशी यांचेही शिक्षण ख्रिस्ती शाळेत झाले होते असेच नव्हे. बहुतेक प्रांतोप्रांतीच्या सुधारकांचे शिक्षण त्या काळानुसार ख्रिस्ती शाळेत झाले. सर्वांवरच पाश्चात्त्य संस्कृती, धर्म, राज्य, भाषा यांचा परिणाम होणे अशक्य नव्हते. पुणे वर्णनकर्त्यांनी लोकहितवादींचाही गौरवपूर्वक परिचय करून दिला आहे. घरातील पूर्वपरंपरा व जुने संस्कार यांमध्ये वाढलेल्या नवपदवीधर विष्णुशास्त्रींच्यावर वरील सुधारक मंडळींच्या एवढा पाश्चात्त्य धर्माचा परिणाम होऊ शकला नाही. विष्णुशास्त्री यांचा जन्म इ. स. १८५० साली पुणे येथेच झाला; ते जोतीरावांच्यापेक्षा वीसपंचवीस वर्षांनी लहान होते; व जोतीरावांच्या अगोदर १८८२ सालातच अवघ्या बत्तीसाव्या वर्षी अल्पायुषी होऊन वारले. सन १८८० मध्ये शिक्षक म्हणून त्यांनी जी सरकारी नोकरी धरली होती ती सोडली; व १८७४ साली 'निबंधमाला' (Garland of Essays) नामक मराठी मासिक चालू केले. जोतीरावानी १८८५ मध्ये 'सत्सार' नामक मासिक पुस्तकाचे दोन अंक काढले. पुढे त्यांनाही मासिक बंद करावे लागले!

अनुक्रमणिका

यशापयशाला दोघेही सामोरे गेले. दोघांनाही जिद्द होती. दोघांनाही भाऊबंदकीचा घरी त्रास झाला.

जोतीराव व विष्णुशास्त्री पुण्यातच जन्मले व तेथेच त्यांची आयुष्ये संपली. निबंधमालाकारांचे वडील कृष्णशास्त्री चिपळूणकर (ज. १८४४, मृ. १८७८) हे १८५१ सालात कै. आण्णासाहेब चिपळूणकर यांच्या वाड्यात जी मुलींची शाळा सुधारक मण्डळींनी काढली होती, तिच्या मंडळावर सभासद होते. पैकी जोती गोविंद फुले यांचा कार्यकारिणीत पहिला नंबर होता व कृष्णशास्त्री चिपळूणकर हे सातवे सदस्य होते. लोकहितवादी व त्यांच्या पिढीतील पुण्यातील सार्वजनिक कार्यकर्ते यांची परस्परात ओळख होती. कृष्णशास्त्री अर्थात जोतीरावांना पूर्ण समक्ष ओळखीत होते. त्यांचे चिरंजीव विष्णुशास्त्री यांनी फुल्यांची ओळख 'पुणे वर्णन' व 'गुलामगिरी' ह्या दोन पुस्तकांवरून करून घेतली व वाचकांना करून दिली. जोतीराव व विष्णुशास्त्री यांची समक्ष जानपिछान होती का नव्हती? यासंबंधी मालाकारांनी निश्चित विधाने केलेली नाहीत. मात्र त्यांच्या वडिलांच्या एवढा जोतीरावांशी विष्णुशास्त्रींचा प्रत्यक्ष संबंध आलेला नव्हता. "मि. जोती वयाने चांगले पोक्त आहेत म्हणून ऐकतो" (पृ. ४५४) असे निबंधमालेच्या ४४ व्या अंकात स्वतः विष्णुशास्त्री, तर्कयुक्त विधान करिते झाले. जोतीराव मात्र विष्णुशास्त्री, त्यांचे न्यू इंग्लिश स्कूल वगैरे कार्ये चांगली जाणीत होते. हंटर कमिशनपुढील साक्षीत विष्णुशास्त्री यांच्या पश्चात जोतीरावानी त्यांचा गौरवपूर्वक उल्लेख केलेला आहे. विष्णुशास्त्र्यांच्या विविध उपक्रमांना फुल्यांचा विरोध नव्हता. जोतीरावांची प्रत्यक्ष ओळख, मैत्री व जवळचा संबंध तरुण विष्णुशास्त्र्यांना लाभला असता तर पुस्तकातून वज्रासारखे कठीण वाटणारे जोतीबा मनाने मेणाहून मऊ आहेत, ह्याचा अनुभव स्वतः निबंधमालाकारांना येऊ शकला असता. निरनिराळे धर्म, विविध व्यावसायिक जाती, ब्राह्मण समाजात जन्म पावलेले उदारमतवादी वर्गमित्र, परदेशी मिशनरी, युरोपियन अधिकारी, वासुदेव बळवंत फडक्यांसारखे क्रांतिकारक, रानडे-भाण्डारकर व त्यांचे मित्र वगैरेंशी मैत्रीचा व जवळचा संबंध राखणारे संपर्कशील व संघटनाकुशल जोतीबा व्यवहारात प्रत्यक्ष तेवढे तुसड नव्हते. अस्पृश्य मानिलेल्यांपैकी मांग-महार वगैरेंशी मैत्री रोटी-भेटी प्रत्यक्ष अंमलात आणणारे जोतीबा प्रत्यक्ष संबंधाभावी पंडित विष्णुशास्त्री यांना समजू शकले नाहीत.

'पुणे वर्णन' हे पुस्तक कै. जोशी वि. ना. यांनी बाबा पदमणजींनाच अर्पण केले आहे

गुलामगिरी व 'पुणे वर्णन' देखील निबंधमालाकारांनी पूर्णपणे सर्व वाचून काढलेले दिसत नाही. पुणे वर्णन व गुलामगिरी या पुस्तकांवरून 'असे समजते' यांसारखी मोघम वाक्ये चिपळूणकरात आहेत; त्यांनी ठिकठिकाणी तर्क वापरला आहे; अंदाज केला आहे.

'पुणे वर्णन' या पुस्तकाची ओळख प्रि. कै. गोविंद चिमणाजी भाटे यांनी त्यांच्या History of Marathi Literature (1800–1939) या पुस्तकात पुढीलप्रमाणे करून दिली आहे. "It is writen in a fine style. It gives very fullest information about New Poona. The auther seems to have taken a lot of trouble in collecting varied information about the city and its old and new institutions. It is a book that describes reporting; it is so interesting and instructive." (Page No. 108). 'पुणे वर्णन' पुस्तकाला इ. स. १९७१ साली दुसऱ्या आवृत्तीचा मान प्राप्त झाला. पुणे वर्णनकर्ते जोशी, बाबा पदमणजी, सत्यदीपिकाकर्ते व "ज्ञानोदय" साप्ताहिक वगैरेंनी केलेली मराठी भाषेची सेवा त्याकडे मराठी भाषेचे शिवाजी विष्णुशास्त्री यांचे दुर्लक्ष झाले. पण आता या सर्वांचा अनेक मराठी वाङ्मय–इतिहासकारांनी योग्य तो परामर्ष घेतलेला आहे. ख्रिस्ती मराठी वाङ्मयसेवक व कवी केवळ धर्मांतरित म्हणून आता नगण्य मानिले जात नाहीत. नारायण विष्णु जोशी यांनी सन १८९४ साली 'हिंदु मुलींचे खेळ' हे पुस्तक लिहिले अशी नोंद वरील इंग्रजी इतिहासात आढळते. म्हणजे विष्णुशास्त्री व जोतीराव यांच्या नंतरही जोशी पुणे वर्णनकार हयात होते, असा निर्णय घेता येतो.

हिंदुधर्माभिमान व स्वदेशाभिमान एवढ्या मनोवृत्तीतून निबंधमालेने देशी व विदेशी मिशनरी, त्यांचे सुधारक देशी मित्र यांच्याकडे पाहिले. चिपळूणकरांच्या व फुल्यांच्याही समकाळात पुढील जातीय व पक्षीय ब्राह्मण–ब्राह्मणेतर दृष्टी फारशी अस्तित्वात नव्हती. "ब्राह्मणेतर" हा पुढे पडलेला शब्द देखील दोघांच्या विवेचनात नव्हता. लोकहितवादी–दयानंद–रानडे–प्रार्थनासमाज ह्यांवरील निबंधमालेची टीका वाचल्यास चिपळूणकरांचा स्वधर्म–स्वदेश व स्वभाषा यांचा कट्टर आभिमान टीकेस कारणीभूत झालेला दिसतो. आर्यसमाज–प्रार्थनासमाज व सत्यशोधक समाज ह्या सर्वांना वरील एकाच मापाने त्यांनी तोलले, व चिपळूणकर यांच्या काळात वरील चळवळीतून अंतर्गत नंतर पुढे पडलेला पृथकपणा नव्हता. फुले व चिपळूणकर यांच्यामध्ये साम्यापेक्षा वैषम्ये अधिक आहेत. दोघे आपआपल्यापरी दोन भिन्न टोकांस गेले आहेत. म्हणून काही साम्ये असूनही दिसत नाहीत.

### उपहास अलंकार

फुले व चिपळूणकर यांनी दोघांनी प्रतिपक्षाचे महत्त्व कमी करण्यासाठी उपहासाचा उपयोग केला. दोघांच्या शिक्षणांत व संस्कारांत फार फरक होता. चिपळूणकरांच्या घरात ज्ञानार्जनाची परंपरा होती व ते स्वतः आयंग्लपंडित व पदवीधर होते. ही तफावत न पाहता चिपळूणकरांनी प्राकृत फुल्यांना धारेवर धरले. यामुळे म. फुल्यांना महत्त्व चढले ! स्वतः फुल्यांनी चिपळूणकरांच्या टीकेस पुढे कधीच उत्तर दिले नाही ! फुले यांच्या साहित्यात ब्राह्मण व ब्राह्मणी धर्म व त्यांचे ग्रंथ ह्यांवर टीका का आली ? व चिपळूणकरांनी मिशनरी–इंग्रजसरकार व दयानंदांसह सर्वच सुधारक यांना प्रतिपक्षी का केले ? ह्या प्रश्नांची उत्तरे अगोदर समजावून घेतली पाहिजेत; असे केल्यास दोघांचीही रास्त व हिशेबी योग्यता व कार्य जाणण्याचा मार्ग खुला होतो. यासाठी दोघांतील यापुढे जातिवेधी व व्यक्तिवेधी उपहास दूर ठेविला पाहिजे. जोतीबात जातिवेधी व व्यक्तिवेधी टीका मुळीच नाही, असे नव्हे. उदा., निबंधमालाकारांचे वडील कृष्णशास्त्री यांच्यावर जोतीबांनी व्यक्तिवेधी जहरी टीका केली आहेच.[२] आणखी काही जणांवर नाव न घेता किंवा नाव घेऊनही जोतीबांनी घणाघात घातले आहेत. या दृष्टीने दोघांचीही लेखणी धारदार आहेच. पण उपहासाचा अलंकार (?) दोघांतूनही काढून सार्वजनिक हिताचे फक्त मुद्दे एका बाजूस यापुढे काढून त्यांचाच सारासार विवेक केल्यास सर्वांचा जास्ती लाभ होणारा आहे. असा हा एक नम्र प्रयत्न आहे. कोणाचाच केवळ विभूतिपूजेस्तव येथे पक्ष घ्यावयाचा नाही; व ऐतिहासिक काही काही मुद्दे–विचार–चिपळूणकरांच्या टीकेच्याद्वारेच स्पष्ट होतात, म्हणून त्यांच्या शब्दांतच जोतीरावांचे चरित्र–कार्य व विचार विषद होऊ शकतात; म्हणून प्रश्नच राहत नाही. कोण कोणापेक्षा मोठा व कोण लहान अशीही तुलना येथे करावयाची नाही. दोघांचे दोघांच्या दृष्टिकोनातून जे सार्वजनिक महत्त्व आहे. ते विषद करावयाचे आहे. यामुळे या दोघांचे भिन्न स्वभाव व भिन्न कार्य समजते.

### चिपळूणकरांच्या शब्दांत फुले

सत्यशोधक समाज व जोतीरावांचे गुलामगिरी पुस्तक ह्यावर परीक्षण करण्यापूर्वी फुले यांची पुढीलप्रमाणे वाचकास मालाकारांनी ओळख करून दिली आहे.

" ... जोतीराव गोविंदराव फुले हे वर सांगितलेल्या समाजाचे मुख्य पुरस्कर्ते व आधारस्तंभ होत. या गृहस्थांच्या अंगी अनेक गुण वास करताहेत. ते कोणते म्हणाल तर ते कवी आहेत, इतिहासज्ञ आहेत, मोठे गहन भाषापंडित आहेत. वक्ते आहेत. आणि सर्वांत विशेषतः सांगण्यासारखे हे की, आमच्या देशात आलिकडे लोककल्याणाला वाहिलेली जी मंडळी चोहोकडे आढळते त्यात तर यांच्यासारखे केवळ तद्रूप बनलेले थोडेच सापडतील ! हे काम आज पुष्कळ वर्षांपासून ते करीत आहेत ... ... " (पृ. ४४२)

### निबंधमालेचे कार्य

जोतीरावांच्या शिवाजीच्या पोवाड्यात काव्यशक्ती आहे. इतिहास व व्युत्पत्ती यांच्या शोधनाकडे फुल्यांची प्रवृत्ती होती. चिपळूणकरांनी जोतीरावांच्या गुलामगिरी पुस्तकातील पुराणेतिहासाची टर उडविली, हे खरे. तथापि जोतीबांनी स्वतः

त्यांच्या परीने प्राचीन काळापासून ते अव्वल इंग्रजीतील अर्वाचीन इतिहासाचा जो आढावा घेतला आहे, तो सर्वथा चूक व संपूर्ण अप्रमाण ठरविणेही कठीण आहे. सत्यांश शोधिता येतोच. हा कोणीच तपासू नये, हेही खरे नव्हे. फुल्यातील सत्य शोधलेच पाहिजे. भाषेच्या दृष्टीने व्युत्पत्त्या वगैरे जोतीरावांनी मांडल्या आहेत, त्या देखील सर्वथा खऱ्या नसल्या तरी त्या संशोधनाला प्रेरक ठरतात. सरकारी नोकरी उपलब्ध होणे पूर्ण शक्य असताना लोककल्याणार्थ समर्पित होणारे जोतीराव हे पहिले वगैरे जो वादातीत चरित्र व कार्य– भाग आहे, तो दिवसेंदिवस सर्वमान्य होत चालला आहे. मालाकार व फुले यांच्या वेळचा अव्वल इंग्रजीचा काल आता स्वातंत्र्यात इतिहासात जमा झाला आहे. वर्तमान व भविष्यकाळाच्या दृष्टीने नवी चिकित्सा करणे भाग आहे.

ज्या रिपोर्टावर निबंधमालेत अभिप्राय आला, तो स. शो. समाजाचा वार्षिक रिपोर्ट मालसे–कीर यांनी संपादित केलेल्या समग्रवाङ्मयात उपलब्ध होईपर्यंत अंधारातच होता. गुलामगिरी वगैरे पुस्तके १८९० नंतर दुर्मिळ झाली. अशा मध्यंतरीच्या काळात निबंधमालेने जोतीरावांची व त्यांच्या समाजाची प्रतिक्रियात्मक ओळख करून देण्याची का होईना, जी कामगिरी केली, ती विरोधी भक्ती वाचूनच पुष्कळांना जोतीबांचा वेध घ्यावा लागला. यामुळे सुशिक्षित व जाणत्या वर्गात जोतीरावां-विषयी योग्य तो समज निर्माण होऊ शकलाच नाही. आगरकर व टिळक यांच्यावरही ह्या टीकेचा परिणाम झाला. बहुजन समाजातील जे शिकले व वाचक होऊन निबंधमालेतील टीका ज्यांनी वाचली, त्यांचाही बुद्धिभेद झाला. कै. भास्करराव जाधव यांनी त्यांचाही जोतीबांसंबंधी गैरसमज चिपळूणकरी टीकेमुळे झाला होता, असे नमूद केले आहे.' ज्या उद्देशाने विरोधी परीक्षण मालाकारांनी लिहिले, तो त्यांचा उद्देश बराच काळ यशस्वी ठरला होता; हा एक प्रवाह त्यांनी आडविला होता, असे सामर्थ्य निबंधमालेत होते. यामुळे त्यांची टीकाशक्ती प्रचितीस येऊन चुकली होती. पण १९२३ नंतर काळ पालटून जोतीरावांचे महत्त्व मराठी वाचकांना उत्तरोत्तर कळून येऊ लागले. तरी चिपळूणकरांची टीका ही इष्टापत्ती मानावी लागते. तिच्यामुळे जोतीरावांचे महत्त्व व कार्य समजते. त्यांच्या चळवळीतील दोष व उणिवा जाणता येतात.

खुद्द सत्यशोधक समाजाच्या वरील रिपोर्टाचे लेखक स्वतः फुले मुळीच नव्हते. स. शो. समाज कार्यकारी मण्डळ असलेली संस्था झाली होती. रिपोर्ट हा तिचा अहवाल होता. 'गुलामगिरी व ब्राह्मणांचे कसब' ही दोन पुस्तके पैदा करून त्यांवर मालाकारांनी विरोधी भाष्य केले; पण ही पुस्तके अभिप्रायार्थ धाडलीच नव्हती! संपादक या नात्याने फक्त पाठविलेल्या रिपोर्टावर लिहिणे, एवढीच मर्यादा होती. पण एवढ्यामुळे भागत नव्हते. प्रत्यक्ष समाज निघण्यास कारणीभूत होणारे नेतृत्व व विचार ज्यांचे होते, त्या जोतीरावांची वाचकांना ओळख करून देणे मालाकारांना भाग वाटले. त्या-शिवाय रिपोर्टाची पार्श्वभूमी व मूळ कारण वाचक जाणू शकत नव्हते. एखाद्या ग्रंथकर्त्याचे पुस्तक एखाद्या चळवळीस जन्म देते, अशी काही "गुलाम-गिरी" सारखी सामर्थ्यवान अगदी थोडीच पुस्तके वाङ्मयेतिहासात आढळतात. मालाकार यांच्या प्रतिकारप्रधान टीकेचे स्वरूप पूर्णतः खरे मानले तरी गुलामगिरी पुस्तकाचा महाराष्ट्रावर झालेला जागृतिकारक परिणाम गौण मानिता येत नाही. या पुस्तकाच्या आतापर्यंत पाचसहा आवृत्त्या निघाल्या. बहुजन समाजातच ह्या पुस्तकाने अस्मिता जागृत केली असेच केवळ नव्हे, तर डॉ. आंबेड-कर व त्यांच्या पूर्वीचे व नंतरचे नेते व विवेकवंत जे झाले त्यांनीही गुलामगिरी पुस्तकातून स्फूर्ती घेतली. एकूण दलितांच्या चळवळीस जन्म देणारे म्हणूनही हे पुस्तक म्हणजे अर्धसत्य (सत्याची एक बाजू) व विध्वंसक म्हणून समजणे न्याय-शीलतेचे द्योतक नव्हे. कारण हजारो वर्षे अचेतन राहिलेल्या विराट समाजाला ह्या गुलामगिरीने चेतना दिली. विद्याजागृती हा गुलामगिरी पुस्तक व त्याचे अपत्य जो सत्यशोधक समाज याने अनेक विद्याप्रसारक कर्मवीरांना जन्म दिला. महर्षि शिंदे, भाऊराव पाटील, पंजाबराव देशमुख, शाहू महाराज, सयाजीराव गायकवाड वगैरे कर्मवीरांची पुढे मालिकाच लागून राहिली. परंतु महाराष्ट्रात फुले


अनुक्रमणिका

व चिपळूणकर या दोन विचारसरिता पृथकपणेच वाहत राहिल्या.

निबंधमाला म्हणजे एक ज्ञानकोष आहे. नवयुगसमाजावर व अनेक सुधारकांवर मालेने टीका केली, त्यांना विरोध केला म्हणून मालेचे महत्त्व कमी मानणे, हा दुसरा अन्याय आहे. 'गुलामगिरी' पुस्तकाने 'दीनबंधु' (१८७७) या पत्रास जन्म दिला तसाच मालेने 'केसरी' व लोकमान्य टिळक यांच्या देशाभिमानी व स्वराज्यवादी प्रवाहास जन्म दिला. आगरकर व बॅ. सावरकर यांचा वैचारिक पवित्रा वेगळा वाटला तरी चिपळूणकरांचा "केसरी" दोघांनाही पायाभूतच होता. ज्यांची कीर्ती चिपळूणकरांच्याही पेक्षा गाजली–गाजते–त्या टिळकांना लोकमान्य होण्याचा मार्ग निबंधमालेने काढला; व शोधिला.

## जोतीरावांचा शोध

फुले हा एक चमत्कार वाटतो. 'लोकविलक्षण', 'न भूतो न भविष्यति' असा हा कार्यकर्ता मराठी लेखक झाला. त्यांच्या चरित्राचा बोध व शोध मालकारांच्या लेखणीतूनही लागतो. उदा., चिपळूणकर लिहितात : "तात्यासाहेबास–जोतीरावांना–सरकारने एक शालजोडी आनंदाने बक्षिस दिली." शाळेचा १३।२।१८५३ रोजी मोठा समारंभ झाला.[४] ह्या वेळी कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर उपस्थित होते. सरकारी सत्कारानंतर मिसेस मिचेलच्या बोर्डींगस्कूलवर जोतीबांनी शिक्षकी नोकरी धरली. ह्या नाही त्या प्रकारच्या मिशनरी संबंधामुळे हिंदुधर्माभिमानी भाऊबंद-माळीसमाज यांचाही गैरसमज पूर्वी झाला होता.

१८५७ च्या उठावाला जोतीराव 'भटपांड्यांचे बंड' म्हणजे उच्चभ्रू व सरंजामदारांचे बंड म्हणाले. सर अर्स्किन पेरी वगैरे युरोपियन अधिकाऱ्यांनी मुलीमुलांच्या शाळेला मदत केली म्हणून 'राजनिष्ठ' जोतीरावांनी पराकाष्ठेची कृतज्ञता व्यक्त केली होती. बंडाच्या अनुभवामुळे वरील सर्व युरोपियन "तेही जेव्हा त्यांचा (फुल्यांचा) तिटकारा करू लागले, व त्यास हिडीसफिडीस करू लागले, म्हणून तात्यासाहेबास परम वैराग्य प्राप्त झाले". १८५७ चा उठाव जोतीरावांच्या जीवनात क्रांतिकारक ठरला व पुढे चिपळूणकर लिहितात की–"त्यांचा पहिला अवतार समाप्त झाला !" जोतीरावांसंबंधीची ही माहिती गुलामगिरीत मधूनअधून जे आत्मोद्‌गार त्यांनी स्वतः व्यक्त केले आहेत, त्यांवरूनच चिपळूणकरांना प्राप्त झाली. 'पुणे वर्णन', 'गुलामगिरी' व स. शो. समाज यांना बाबा पदमणजी व तत्समांकडून, प्रेरणा मिळतात, असे चिपळूणकरांचे मत झाले.

पुणे वर्णनात जेम्स मिचेल, रेव्ह. मरे मिचेल ह्या स्कॉटिश मिशनऱ्यांच्या शाळा, त्यांचे आश्रम-बोर्डींग, धर्मप्रचाराचे प्रयत्न, त्यांनी चालविलेली पहिली इंग्रजी शाळा या संबंधी पुष्कळ खरी माहिती मिळते. पेशवाई बुडाल्यानंतर पुण्याच्या सार्वजनिक जीवनाला ह्यांनीच सुरुवात केली. फुले व लोकहितवादी आणि त्यांचे मित्र व खुद्द बाबा पदमणजी यांचा स्कॉटिश मिशनऱ्यांशी कालमान-परिस्थितीमुळे संबंध आला होता. पुणे वर्णनकर्ते जोशी यांनी बाबा पदमणजींचे साह्य व सहकार्य मिळाल्याबद्दल प्रस्तावनेत स्वतः उल्लेख केला आहे. जोशी यांनी रेव्ह. मरे मिचेल यांचा मिशनरी स्वभाव सांगताना बायबलातील उल्लेख घेतले आहेत असे जे चिपळूणकर लिहितात, ते खरेच आहे. जोतीबांच्या शाळांची पुष्कळ माहिती दिल्यानंतर त्यांचा सत्कार झाल्यावर ते स्वस्थ घरी बसले आहेत, असे विधान पुणे वर्णनकारांनी केले आहे. त्यावरून तसेच विधान चिपळूणकर यांच्या लेखनात आले आहे : "पुनः दहावीस वर्षांनी त्यास स्वस्थ बसण्याचा कंटाळा येऊन ते ग्रंथकर्ते या नात्याने पुनः अवतीर्ण झाले." वास्तविक ह्या मधल्या काळात पुण्यातील पहिल्या पुनर्विवाहास साह्य, बालहत्या-प्रतिबंधकगृह चालविणे, जातिभेद विवेकसार ह्या जातिभेद-खंडणपर ग्रंथाची दुसरी आवृत्ती काढणे, अतिशूद्रांस घरातील हौद मोकळा करणे, शिवाजीचा पोवाडा व 'कसब' ही दोन पुस्तके लिहून प्रसिद्ध करणे, वगैरे कार्ये जोतीरावांच्या प्रत्यक्ष जमेस आहेत व नंतर १८७२/७३ साली गुलामगिरी पुस्तक प्रसिद्ध झाले. त्या अगोदर 'ब्राह्मणांचे कसब' (१८६९) व शिवाजीचा पोवाडा त्यांनी उपलब्ध केला. १८५५ साली एक नाटक जोतीरावांनी तयार केले होते. ही मागील व पुढील पुस्तके प्रसिद्ध केल्यामुळे व सत्यशोधक समाज

काढल्यामुळे ख्रिस्तीधर्म व त्याचे मिशनरी व इंग्रज प्रभू यांचा काय फायदा झाला, व त्यांना व ज्ञानोदयाला व सत्यदीपिकेला ह्या सर्वांपासुन कोणता लाभ घडला ? याचा हिशेब आज केला तर तत्कालीन मिशनऱ्यांची स्वतंत्र निघालेल्या सत्यशोधक समाजाकडून (व प्रार्थना समाजाकडूनही) पूर्ण निराशा झाली.

## निबंधमालेच्या प्रतिक्रियेची खरी कारणे

प्रसिद्ध फुले चरित्रकर्ते श्रीमान धनंजय कीर यांनी दिलेले चिपळूणकरांची जोतीराव यांच्यावर जी टीका झाली, त्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे जोतीरावांनी मालाकारांच्या वडिलांच्या खाजगी वर्तनासंबंधी काढलेले उद्‌गार हे होय. पण हे मूलभूत व तत्त्वभूत आणि सार्वजनिक कारण नव्हे. मिशनऱ्यांनी हिंदुधर्म व त्यांचे देव व ग्रंथ यांच्यावर उपहासात्मक टीका चालू केली होती व ते हिंदूंना बाटवतही होते. विष्णुबुवा ब्रह्मचारी हे ह्या टीकेला व आक्रमणाला तोंड देत होते. हा पवित्रा जोतीबांनी घेतला नव्हता. उलट 'ज्ञानोदय', 'सत्यदीपिका', 'नानाविध चर्च-संग्रह' यांच्या निरंतर पवित्र परिशीलनाने ब्राह्मणद्वेषाचे मोलवान् तत्त्व त्यानी पटकावले असावे ! "जोतीरावांनी सत्यशोधक समाजाकरता नवे शुभवर्तमान (गुलामगिरी पुस्तक) तयार करून देताना 'ब्राह्मणांचा कृत्रिमरूपी कोट फोडणारे जे अमेरिकन व स्कॉच् उपदेशक' त्यांचा बिलकूल सल्ला घेतलाच नसेल काय ? किंवा निदान 'पुण्याच्या वर्णना'ला बाप्तिस्मा देऊन त्याचे जे पारलौकिक जामीन होऊन बसले त्यांच्या पवित्र अवलोकनाखाली तरी आपले नवीन अपत्य जोतीबांनी काही वेळ असू दिले नसेल काय ?" चिपळूणकरांना ही शंका होती. हा पूर्वग्रह होता. पण ह्याला गुलामगिरी पुस्तकातील काही भाग जबाबदार झाला होता, हे मान्य करावे लागते.

सत्यशोधक समाज स्थापन करण्यापूर्वी ५ डिसेंबर १८७२ रोजी एक पत्र तयार करून ते पुण्यात निघणाऱ्या "लोककल्याणेच्छू" नामक वर्तमानपत्राकडे प्रसिद्धीप्रीत्यर्थ पाठविले. "लोककल्याणेच्छूने" हे पत्र "एक अप्रयोजक अशा प्रकारचे आत्मश्लाघेचे व ब्राह्मणांच्या निंदेचे पत्र" अशा दृष्टीने जोतीरावांच्या पत्राकडे पाहिले व "पत्रास जागा मिळण्याचा संभव नाही" असे ४ जानेवारी १८७३ च्या "लोककल्याणेच्छू"च्या अंकात जाहीर केले. परंतु पुण्यातील लोककल्याणेच्छूने जोतीरावांचा 'महाज्ञानी, महाविचारी व महाशोधक' असा उल्लेख करून पत्र प्रसिद्ध करिता येत नाही म्हणून माफीची याचना केली. पुण्यातील हिंदु नियतकालिकांचे फुल्यांना सहकार्य मिळणे अशक्य झाले. कारण फुल्यात ब्राह्मणविरोध होता.

जोतीराव प्रयत्नशील होते. नाइलाजाने त्यांनी हे पत्र "नानाविध चर्च-संग्रह" (कोल्हापूर) या ख्रिस्ती पत्राकडे पाठविले. या पत्राने जोतीरावांचे पत्र प्रसिद्ध केले "... वास्तविक पाहिल्यास ब्राह्मणांनी मानिल्याप्रमाणे जातिभेद नाही असे मि. जोतीच्या लक्षात पक्के आल्यावरून मी कोणा पाहिजे त्याशी अन्नव्यवहार करीन असे त्यांनी धैर्याने सांगितले. असे छातीचे पुरुष देशात पुष्कळ लवकर होवोत." नानाविध चर्च-संग्रहाने असा अभिप्राय दिला. गुलामगिरीची इंग्रजी व मराठी प्रस्तावना जोतीरावांचे मनोगत, हेतू व उद्देश सांगणारी आहे. शूद्रातिशूद्रांची ही कैफियत आहे. जोतीरावांनी दावा का मांडला ? याची उत्तरे शोधता येतात. जोतीराव ह्यांच्या ठिकाणी ब्राह्मणांविषयी अप्रीती का निर्माण झाली, याची मूलभूत शूद्रातिशूद्र जनतेस नडणारी कारणे, जी गुलामगिरीच्या प्रस्तावनेत व उत्तरार्धात जोतीबानी दिली आहेत, त्यांकडे निबंधमालाकारांनी एक सार्वजनिक गरीब जनतेचा प्रश्न म्हणून पाहिलेच नाही. युरोपीयन अधिकारी व मिशनरी यांच्या नेतृत्वाचा तो काळ होता. काळाच्या मर्यादा अटळ होत्या.

गुलामगिरीच्या इंग्रजी व मराठी प्रस्तावनांना चिपळूणकरांनी स्पर्शही केला नाही. जोतीरावांच्या मराठी भाषेला दोष देणाऱ्या चिपळूणकरांना इंग्रजी प्रस्तावनेतील भाषेची प्रशंसा करिता आली असती.

"मि. फुले याजविषयी केवळ लोकप्रवादावरून सामान्यतः आमची अशी कल्पना आजपर्यंत असे की— हे जात्या शूद्र असल्यामुळे इंग्रजी ज्ञानाच्या योगाने त्यांच्या ठायी ब्राह्मणाविषयी स्पर्धा उत्पन्न झालेली असावी ..." (पृ. ४४९). जोतीराव (तुकारामाप्रमाणे) शूद्रांत जन्मले म्हणून त्यांना

अनुक्रमणिका

शूद्रातिशूद्रांची अवस्था व विद्येतील पूर्ण मागासपण दिसून आले; व इंग्रजी राज्य झाल्यानंतर त्यांना व त्यांच्या काही मित्रांना विद्येचा प्रथम लाभ झाला. चिपळूणकरांच्या ह्या वाक्यावरून जोतीरावांचे इंग्रजी शिक्षण झाले होते, व त्यांच्या संबंधी त्या समकाळात फुल्यांच्या विषयी लोकप्रवाद रूढ होते. लोकप्रवादांवरून त्यांचे मूल्यमापन पुढे व आजही काही करितात ! " लोकप्रवाद" दोघांविषयी होते. दुसऱ्याना दोघांनीही शिव्या दिल्या.

विष्णुशास्त्री यांनाही लोकमताचा सुगावा पूर्वीच लागला होता. पहिले वर्ष संपल्यावर आढावा घेताना ते स्वतः लिहितात : " या पुस्तकाचा ( निबंधमालेचा ) उद्देश ज्यास त्यास शिव्या द्याव्या, ज्यांची त्यांची फजिती करावी, येवढाच पुष्कळांचे मते आहे. " ...... "आपली प्रतिष्ठा मिरवावी इतकाच या लिहिणाराचा ( विष्णुशास्त्र्यांचा ) उद्देश आहे. " ( पृ. १८२ ) हिंदुलोकांत निबंधमालेविषयी असा समज वाढत होता, व ज्या ज्ञानोदयाची व जोतीरावांची मैत्री होती, त्या ज्ञानोदयाने तर " आम्हावर मोठाच कडाका उठवून राजद्रोहही ते आम्हावर शाबीत करू पहात होते " असा खुलासा निबंधमालाकारानी मागे करून ठेविलेला स्पष्ट आढळतो( पृ. १८२ ). 'ज्ञानोदय' व 'सत्यदीपिका' ह्या ख्रिस्ती नियतकालिकांचे व चिपळूणकर यांचे फाटले होते. हे चिपळूणकरांनीच स्वतः सांगितले. दक्षिणा प्राइज कमेटी, " लोककल्याणेच्छू " पत्र वगैरे सुशिक्षितांचा जोतीरावांना पाठिंबा मिळाला नाही; मिळणे अशक्य झाले. हे जोतीरावांनी स्वतः अनुभवाने गुलामगिरी पुस्तकात निवेदिले आहे. जोतीरावांचा शूद्रातिशूद्र अफाट समाज सर्वथा निरक्षर होता; रूढीप्रिय दरिद्री व अंधश्रद्ध होता. जे काही थोडे साक्षर व अर्धशिक्षित झाले होते, ते जोतीरावांभोंवती प्रथम जमा झाले होते. त्यांचे आप्तेष्ट—भाऊबंद यांनाही निबंधमालेप्रमाणे देशी-विदेशी मिशनऱ्यांचा सहवास त्याज्य वाटत होता, शिक्षणप्रसारार्थ काढलेल्या शाळा व पुढे शिक्षण-प्रसारक—सत्यशोधक समाज काढून तो वाढवावयाचा झाल्यास देशी व विदेशी मिशनरी, सरकारी अधिकारी यांच्याशिवाय दुसऱ्या कोणाचे साह्य होण्यासारखी परिस्थितीच अव्वल इंग्रजीत नव्हती !

" इंग्रेज सरकारविषयी केवढी अपार राजभक्ति !" या भक्तीचा वारंवार उल्लेख चिपळूणकरांना गुलामगिरीत अर्थात आढळला; व निबंधमालाकारांचे मत इंग्रज, त्यांचा धर्म, संस्कृती व राज्य यांविषयी बिलकूल अनुकूल नव्हते. या साऱ्यांविषयी त्यांना पूर्ण घृणा होती. जोतीबा व निबंधमालाकार यांच्यांत असे मनस्वी अंतर का पडले ? या प्रश्नाचा तात्त्विक उलगडा वरील प्रमाणे आणखी करिता येण्यासारखा खास आहे. जोतीबांना सामाजिक—धार्मिक स्वातंत्र्याची निकड होती व त्यांचा शूद्रातिशूद्र विराट समाज दारुण दारिद्र्य, अंधश्रद्धा, निरक्षरता यांच्या गर्तेत लोळत पडला होता. पेशवाई गेल्यावर आलेले परकीय राज्य निबंधमालेला स्वागतार्ह वाटणे अशक्य होते. राज्यामुळे हिंदुस्थानावर धार्मिक-सांस्कृतिक आक्रमणही ओघानेच होऊ लागले होते. याची जाणीव निबंधमालेला प्रथम तीव्रतेने झाली. स्वदेश, स्वधर्म, व स्वभाषा ह्या तिच्या त्रिसूत्रातून तिचा सर्वच अवतार आविष्कारित झाला. निबंधमालाकार व फुले यांच्या दृष्टीत, कार्यात, विचारात, ध्येयात व पुढील प्रवाहात विलक्षण अंतर तत्त्वतः व मूलतः पडले. ह्याला तो काळ जास्ती जबाबदार झाला. कृष्णशास्त्री चिपळूणकर-व जोतीराव यांचा जेवढा संबंध आला तेवढा विष्णुशास्त्री व फुले यांचा मुळीच आला नाही. उलट मुलींच्या शाळेमुळे थोरले शास्त्रीबोवा व जोतीराव यांचा जो सार्वजनिक संबंध आला तो पुढे ह्या शाळा चालविणाऱ्या स्त्रीशिक्षणप्रेमी सुशिक्षितांना स्वतःही मुलींच्या शाळा मागे पुढे चालविता येणे अशक्य झाले. पती—पत्नी फुले यांनाही योग्य ते जीवनवेतन देणे अशक्य झाले; एकपरी नाइलाजाने स्कॉटिश मिशनरी मिसेस मिचेल यांच्या बोर्डींग स्कूलमध्ये जोतीरावांनी नऊ वर्षें नोकरी केली. श्री. धनंजय कीर—मालसे ह्या काळ १८५४ ( सुमारास ) देतात. यामुळेही चिपळूणकर व पुढील टिळक वगैरे तत्समांच्या ठायी हिंदुधर्माभिमानाच्या संदर्भाने गैरसमज रूढ होणे, अशक्य नव्हते. पण वरील नोकरी सोडून जोतीरावांनी सत्यशोधक समाजाच्या स्थापनेचे स्वतंत्र कार्य हाती घेतले व त्यांनी त्यांचा वरील " अवतार " समाप्त केला, असेही स्वतः चिपळूण-

करांनीच म्हटले होते. हे महत्त्वाचे आहे. पण समाप्त झालेल्या अवताराकडे पाहून विष्णुशास्त्री यांनी जास्ती टीका पूर्वग्रहाने केली आहे.

## फुल्यांचा नवा अवतार

देशात वरीलप्रमाणे लोकजागृती होऊ लागली होती. "आमच्या देशाच्या दूर दूर ठिकाणी (पुणे) येथील सत्यशोधक मंडळीचे बहुदा नावही माहीत असण्याचा संभव नाही." सत्यशोधक समाजाच्या रिपोर्टावरूनही पुणे-हडपसर यांखेरीज मुंबई-ठाणे वगैरे इतर ठिकाणी अर्थात स. शो. समाज नव्हता. त्यावेळच्या मुंबई इलाख्यातही इतर ठिकाणी ह्या समाजाचा मागमूस नव्हता. मग हिंदुस्थानातील इतर प्रांतांत हा मुळीच नव्हता, हे मान्य करावे लागते; व आजही महाराष्ट्र राज्य व तामीळनाडू (मद्रास) सोडल्यास ह्या विषयावर विचारप्रपंच करण्याची वेळ इतर प्रांतांतील लोकांस येतच नसावी. फक्त मराठीत फुले व सत्यशोधक समाज ह्यांवर चालू स्वातंत्र्याच्या काळात वर्धमानपणे विचारविनिमय होत असतो. अभिप्राय देताना 'जोतीबा प्रभृति'नी काढलेला समाज सतत चार वर्षे चालू होता. निबंधमालेतून एवढे समजू शकते. स. शो. समाजाचा रिपोर्ट हा 'अहवाल' होता. पण ते पुस्तक याअर्थी परीक्षिले गेले. (पृ. ४४१ ते ४५७)

प्रस्तुत विषयावर विचारप्रपंच करिताना मालाकारांच्या काही ओळी, वाक्ये, वाक्यांश, पृष्ठांकांसह उद्‌धृत शब्द यांनाच प्राधान्य द्यावयाचे आहे. मालाकारांचा उपहास उद्दिष्ट म्हणून लक्षात मात्र घ्यावयाचा नाही असे धोरण आहे. कारण दोघांच्याही पुस्तकांतून बहुतेकपणे पानापानांवर प्रतिपक्षाचा उपहास आहे. जोतीबा तर विटून चिटून पुष्कळ ठिकाणी शिवराळ दिसतात.

सत्यशोधक समाजाच्या (रिपोर्टाची) 'म. फुले : समग्र वाङ्मय' (श्री. मालसे-कीर संपादित, सन १९६९) या ग्रंथात समग्र दुसरी आवृत्ती उपलब्ध आहे. जोतीबांचे नाव कार्यकारी मण्डळाच्या सभासदांत फक्त आढळते. आता त्यांना संस्थापकीय सर्वोच्च मान व स्थान प्राप्त झाले आहे. 'जोतीबाप्रभृति विद्वन्मणींनी मिळून हा समाज स्थापला व प्रथम चालविला; त्याच्या मूळ 'स्वरूपाचे दर्शन' चिपळूणकरी टीकेत मिळते, ते महत्त्वाचे होय. चिपळूणकरांच्या दृष्टीतून जोतीबा त्यांना कसे दिसले?

## श्री. दयानंद, आर्यसमाज व स. शो. समाज

चिपळूणकर व त्यांच्या संप्रदायाने स्वामी दयानंदांस पुण्यात भरपूर विरोध केला. जोतीरावांवर हल्ले चढविण्यापूर्वी मालाकारांनी दयानंदांवर टीका केली होती. चिपळूणकर यांच्या म्हणण्याप्रमाणे खुद्द त्यावेळी आर्यसमाज पुण्यात माजी झाला. आताही पुणे व महाराष्ट्रात आर्यसमाजास अपेक्षेप्रमाणे फारच कमी स्थान प्राप्त झाले. पूर्व महाराष्ट्रात–मराठवाड्यात–काही ठिकाणच्या शाखांची नावे ऐकू येतात. महाराष्ट्रातील आर्यसमाजाचा इतिहास पाहता दयानंद सरस्वती यांना पुण्याला व्याख्याने देण्यास यावे असे पाचारण न्या. मू. रानडे व त्यांच्या मित्रांनी केले होते. हे मित्र प्रार्थनासमाजाचे कार्यकर्ते होते. रानडे यांनी दयानंदांची मिरवणूक, सत्कार आणि पुण्यातील व्याख्याने यशस्वी करण्यास सत्यशोधक मण्डळींचे साह्य घेतले व त्यांनी ते दिले. दयानंदांना विरोध करणारे सारे सनातनी होते. व त्यांचा सत्कार करण्यात सुधारकमतांची विविध मण्डळी एकत्र झाली होती. खुद्द मालाकारांनी २३ व्या अंकात मिरवणुकीचे उपहासगर्भ भाषेत जे पुढील वर्णन दिले आहे, त्यावरून सिद्ध होतेः– "महारापोरांनी व कामाठ्यांनी मशाली व दिवट्या धरल्या आहेत. परमहंस गजेंद्रावर आरूढ झाले आहेत. पुढे बाजांचे ताफे चालले आहेत. व लबाड आणि दुष्ट ब्राह्मणांच्या चिरकालिक दास्यातून विमुक्त झालेले असे त्यांचे शिष्य मोठी कृतकृत्यता मानून आपल्या सद्‌गुरूंचा पार्श्वभाग सुशोभित करताहेत...... ज्या ठिकाणाहून दयेचे व आनंदाचे शुभवर्तमान चोहोंकडे फैलावले त्या पवित्र जागी सगळे बिऱ्हाडी येऊन दाखल झाले." (पृ. ३१७) 'शुभवर्तमान' हा आवडीचा शब्द सत्यशोधक व आर्यसमाजावर टीका करताना शास्त्रीबुवांनी अनेक ठिकाणी वापरलेला आढळतो. दयानंदांच्या मिरवणुकीत स्वतः जोतीबा जातीने हजर असल्याचे विश्वसनीय उल्लेख मिळत नाहीत; पण त्यांचे शिष्य व हितचिंतक सत्यशोधक हजर होते. पुढे मात्र प्रार्थनासमाज व सत्यशोधक समाज यांचा दयानंद व आर्यसमाज

अनुक्रमणिका

यांच्याशी संबंध राहिला नाही. जोतीबांच्या पश्चात फक्त शाहूमहाराजांनी वेदोक्तप्रकरणाच्या काळात आर्य समाजास कोल्हापुरात स्थान व मान दिला. लो. टिळक–प्रवाहांतही आर्यसमाजाचे पुढेमागे स्वागत झाले नाही. श्री. दयानंदांना महाराष्ट्रात यश आले नाही. हे मान्य करावे लागेल.

कै. श्री. फाटक यांच्या न्या. मू. रानडे यांच्या चरित्राच्या आधारे एवढे खास म्हणता येते की, कै. गंगाराम भाऊ म्हस्के वकील व त्यांचे मराठी तत्सम मित्र यांनी दयानंदांची मिरवणूक व व्याख्याने यशस्वी होण्यास रानड्यांना फार मोठी मदत केली. पण हीही मंडळी व स्वतः म्हस्के आर्य-समाजाची धुरा वाहण्यास पुढे आले नाहीत ! कदाचित हा चिपळूणकरांच्या टीकेचा परिणाम असावा ! खुद्द गंगाराम भाऊ म्हस्के वकील व डॉ. विश्राम घोले या सुशिक्षित मराठा पुढाऱ्यांनी सभासद होऊन किंवा आर्यसमाजाच्या कार्यात भाग घेतलेला पुढेही आढळत नाही. निबंधमालेची ह्या सर्व नवसमाजावर जी टीका झाली व तिचा जो ह्या नवसमाजावर व बाहेरच्या सर्वच महाराष्ट्रावर प्रत्यक्षाप्रत्यक्ष परिणाम झाला, तो लक्षात घेण्या-सारखा होता. आजही टीकेतून निघणारे पुढील काही मुद्दे महत्त्वाचे ठरतात. प्रस्तुत लेखक येथे चिपळूण-करी टीका सर्वथा अप्रमाण मानीत नाही.

सत्यशोधक समाजाला चिपळूणकरांनी शूद्र मंड-ळींचा 'सत्यार्थी समाज' असे संबोधिले आहे. यावरून अतिशूद्र–अस्पृश्य–यांच्या उद्धाराचा प्रश्न या शूद्र मंडळींपुढे नव्हता. अतिशूद्रांचा–अस्पृश्यांचा प्रश्न–जोतीबांपुढे होता; तरी त्यांनी फक्त शूद्रांच्या उद्धारार्थ व विशेषतः त्यांच्यांत शिक्षणप्रसार व्हावा म्हणून स. शो. समाज काढला. याच चळवळीला पुढे 'ब्राह्मणेत्तर' चळवळ असे नामाभिधान मिळाले. याचे कारणही ही स. शो. चळवळ मुळातच ब्राह्मणे-तरांसाठीच काढली होती. कारण ते विद्या आदि-करून इतर सर्व सार्वजनिक क्षेत्रांत मागेच होते. सत्यशोधक समाजातूनच पुढे निघालेली ब्राह्मणेतर चळवळ व मूळचा स. शो. समाज वेगळा असा भेद सर्वथा खरा नाही !

या 'शूद्रांचा, भटांचा व जोशांचा' जो हिंदू समाजात संबंध होता ( व आहे ), त्याला स. शो. समाजाने 'दास्य व जुलूम' हे शब्द वापरले आहेत. हे 'दास्य व जुलूम', 'ब्राह्मणांचे कसब' ह्या पुस्तकातील कवितेत फुल्यांनी वर्णिलेले आहेत. त्यापैकी एका काव्यातील फक्त दोन ओळी चिपळूण-करांनी प्रथम उद्धृत केल्या आहेत. पण या पुस्तकात जे विषय आहेत, त्यांवर निबंधमालेने मुळीच लिहिले नाही. निबंधमालेला शंभर वर्षे झाली. ब्राह्मण पुरोहितावर बहिष्कार घालून स्वसमाजातील अब्राह्मण भटाकडून लग्नादी कार्ये करून घेण्याचा समाजाने पश्चिम महाराष्ट्रात बराच प्रयत्न केला; जोशी बिल पास करून घेऊन दक्षिणेचा हक्क-देखील बेकायदेशीर ठरविला. पण आता बहुसंख्य ब्राह्मणेतरांची लग्नादी कार्ये जोश्यांच्या व इतर ब्राह्मण पुरोहितांच्या द्वारेच होतात. हे पुरोहित त्यांना पूर्ववत शूद्र व नीच मानीत नाहीत. सोंवळे न नेस-ताना त्यांच्यांत मिसळतात, जेवतात वगैरे प्रकारे पुष्कळ दरी भरून आली आहे. विरोधाची कारणे गौण व नगण्य बनली आहेत. हल्ली सर्वसामान्य समाजाला रावभट चळवळीची गरजच वाटत नाही. मात्र शिक्षित व प्रशिक्षित अधिकारी पुरो-हितवर्ग फारसा दिसत नाही.

ब्राह्मणी धर्मग्रंथाचे अधिकारी ज्ञानी अभ्यासक धर्मशास्त्री–निबंधमालाकारांच्या काळात ब्राह्मणे-तरात पूर्ण अभावाने होते. पुढे कै. भास्करराव जाधव, महर्षि शिंदे व डॉ. आंबेडकर यांच्या तोलामोलाचे संस्कृतातील ग्रंथांचे अभ्यासक–धर्मशास्त्री–फारच थोडे निपजले. आज दलित लेखक ब्राह्मणी ग्रंथांवर तुटून पडतात, पण त्यांचेही विविध धर्मशास्त्रांचे ज्ञान तोटकेच ठरते. म. फुले यांच्या ब्राह्मणविरोधी चळवळीमुळे निबंधमालेला जाग आली.

संतांना ब्राह्मणांचा विरोध प्रथम झाला; पण पुढे व आता त्यांचा तो कडवा विरोध राहिला नाही. ब्राह्मण समाज संतांना पूज्य समजू लागला. समा-जात वरीलसारखी परिवर्तने होतच राहतात. यांसारख्या काही परिवर्तनांची दखल चिपळूणकरांनी घेतली आहे. स्वतः जोतीबांनी व त्यांच्या वरील समाजाने संतांची कदर केली नाही. प्रार्थनासमाजाने केली.

दर अदितवारी स. शो. समाजात डोळे मिट-ण्याची प्रार्थनेची पद्धत होती. ह्या पद्धतीवर चिपळूण-

करांनी टीका केली आहे. पण ही पद्धत पुढे लवकरच बंद पडली. प्रार्थना समाजात हिचा मागमूस रविवारी आढळतो. तसाही स. शो. समाजात आढळला नाही. याबाबतीत दोन्ही समाज अयशस्वी ठरले. प्रार्थना समाजाला विधिसंस्कार तयार करून देणारा डॉ. भांडारकर यांच्यासारखा विद्वान भेटला. त्यांचीही डाळ शिजली नाही. तेथे अर्धशिक्षित शूद्र बंधू पराभूत झाले, याचे नवल नोव्हे. परंपरा व रूढी ही बलवत्तर ठरली. धर्मक्रांती मागेच पडली ! आध्यात्मिक उपासना लोकप्रिय करण्याच्या कार्यात रानडे–भांडारकर यांना अपयश आले. चिपळूणकरांनी नव्या निघालेल्या समाजांवर (प्रार्थना समाज वगैरे) अन्यत्र जी टीका केली आहे, ती जर त्यांच्या आजच्या पिढीतील विचारवंतांनी अभ्यासली तर त्यांना कालानुरूप नवे परिवर्तन करण्याची काही दिशा सापडेल. चिपळूणकरांच्या आक्षेपांतून अजिबात सत्य नाही व नव्हते, असे आजही म्हणवत नाही. म्हणून तर या लेखाची योजना केली आहे.

## चिपळूणकरांचे आभार व ऋण

म. फुले समग्र वाङ्मय ग्रंथात (१९६९ साली) संशोधक मालसे–कीर यांनी सत्यशोधक समाजाचा त्रैवार्षिक रिपोर्ट समग्र पुन: छापला आहे. मूळ रिपोर्टात १८७३ ते १८७६ पर्यंतची एकंदर झालेली हकीगत यात सर्वांस जाहीर केली होती. ह्यातील स. शो. समाज स्थापण्याचा पुढील उद्देश फक्त निबंधमालेनेच जतन केला होता:–

"ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादि लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकांस मुक्त करण्याकरिता व आपल्या मतलबी ग्रंथाच्या आधारे आज हजारो वर्षे ते शूद्र लोकास नीच मानून गफलतीने लुटीत आले आहेत. यास्तव सदुपदेश व विद्याद्वारे त्यास त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारसंबंधी ब्राह्मणांचे बनावट व कार्यसाधक ग्रंथापासून त्यास मुक्त करण्याकरिता काही सुज्ञ शूद्र मंडळीनी ह्या समाज ता. २४ माहे सप्तंबर सन १८७३ इसवी रोजी स्थापन केला. या समाजात राजकीय विषयावर बोलणे अजी वर्ज्य आहे" (पृ. ४५१).

तळटीपा पुढीलियांना उपयोगी होतील असेही भविष्यपर विधान मालाकारांनी स्वतः केले होते.

## स. शो. समाजाचा उद्देश

चिपळूणकरांनी मूळ रिपोर्टातून उद्धृत केलेला आहे व त्यांची त्यावर टीकाही पुढे आली आहे. हा उद्देश मालसे–कीर यांनी संपादित केलेल्या स. शो. समाजाच्या रिपोर्टात दिलेला नाही. रिपोर्टाची कव्हर पेजेस (काही पाने) मालसे–कीर यांनाही उपलब्ध झालेली नाहीत. छापखान्याचे व प्रकाशकाचे नाव वगैरे असते ते उपलब्ध नाही. निबंधमालेत ज्या तळटीपा स्वत: चिपळूणकरांनी दिल्या होत्या व नंतरच्याही आवृत्त्या काढणाऱ्या पुढील मेहनती संपादकांनी त्यात भर घातली, ह्या सर्व टीपा व वरील समाजाचा मूळ उद्देश उद्धृत करणे; व त्यावर चरित्रात्मक भाष्य करणे हे फुले चरित्रकर्ते कै. पं. सि. पाटील, पाध्ये, टिकेकर, प्रो. सरदार आदिकरून अनेकांना म्हणजे फुलेसमर्थकांना व विरोधकांनाही आतापर्यंत शक्य झाले, व होईल. सन १९३३ साली सत्यशोधक समाजाचा हीरकमहोत्मव ग्रंथ निघाला त्यातही वरील निबंधमालेने जतन केलेला स. शो. समाजाच्या रिपोर्टातील उद्देश उद्धृत केलेला आहे. श्री. धनंजय कीरानाही' चिपळूणकरांनी घेतलेले 'दीनबंधू' पत्रातील उतारे आणि ह्या तळटीपा चरित्र व फुल्यांचे कार्य विषद करण्यास उपयोगी पडल्या. शेकडोंना निबंधमाला हे साधन साह्यभूत झाले, व होईल. म्हणून उपहासाकडे दुर्लक्ष करून चिपळूणकरांचे ऋण मुक्तपणे मान्य करणे एक सार्वजनिक कर्तव्य वाटते.

गुलामगिरी पुस्तकाची किंमत शूद्र-अतिशूद्रास ६ आणे व इतरांस १२ आणे ठेविली होती (पृ. ४५०). पुढे ४५३ पानावर एक तळटीप चिपळूणकरांची आहे. फक्त एकमेकांना शिव्या देण्यासाठी समाज काढणे हे कितपत शहाणपणाचे होते? याचे विशदीकरण करण्यासाठी ही टीप चिपळूणकरांनी योजिली. लोकप्रिय सत्यशोधक समाजाचे अध्यक्ष डॉ. विश्वास रामजी घोले व जोतीबा यांच्यांत पुढे मध्यंतरी मतभेद झाले. कै. घोले यांनी त्यांची मते सत्यशोधक वक्तृत्वसमारंभात स्पष्ट केली होती. ती ज्ञानप्रकाशात आली होती, असे चिपळूणकर तळटीपेत लिहितात. (डॉ. घोले यांची तसबीर प्रथम चित्रशाळेने छापली व पितापुत्र चिपळूणकर व डॉ. घोले यांची शेवटपर्यंत चांगली मैत्री होती.) ही तळटीप




" आमच्या ज्ञातीतील एका प्रमुख विद्वानाने गेल्या मे महिन्यातील सप्ताहात एक व्याख्यान दिले " ह्यावरून ही तळटीप चिपळूणकरांना सुचली. घोले ह्या चिपळूणकरांच्या ज्ञातीतील विद्वानाच्या भाषणास उपस्थित होते. जोतीराव या सभेस नव्हते. असते तर बरे झाले असते, असे चिपळूणकरांनी लिहिले आहे. चिपळूणकरांचा रोख व राग मुख्यत: बाबा पदमणजी यांच्या सत्यदीपिकेवर ज्ञानोदयापेक्षा जास्ती आहे. निबंधमाला अंक ३६ मध्ये दीपिकेचा भरपूर समाचार घेण्यात आला आहे. सत्यदीपिकेप्रमाणे स. शो. समाजाची वृत्ते वगैरे 'सुबोधपत्रिका' व 'ज्ञानप्रकाश' यांनीही छापली होती. पण सत्यदीपिकेवर निबंधमालेचा कटाक्ष जास्ती होता (निबंधमाला पृ. ४५६). सत्यदीपिकाकर्ते बाबा पदमणजी व जोतीराव यांच्यामध्ये जो ज्ञात व अज्ञात मैत्रीचा व सहकार्याचा संबंध होता, तो जर नसता तर चिपळूणकरांना वेगळा काही विवेक करावा लागला असता ! चिपळूणकर व त्यांचा त्या काळातील परंपरागत समाज यांचे सहकार्य जोतीरावांना प्राप्त होणे अशक्य होते.

गुलामगिरीत जोतीबा व मानसशिष्य धोंडीबा यांच्यामधील संवाद आहे. हे धोंडीबा कोण ? याचा शोध विष्णूशास्त्री यांनी (किंवा पुढील मालेच्या आवृत्तीकारांनी) घेतला आहे (नि. मा. ४४८ पृ.). मलपृष्ठावरील 'खरा विद्यार्थी जोतीबांचा धोंडीराम जिव्हाळा' ह्या एकदोन ओळी तळटीपेत विष्णुशास्त्रींनी उद्धृत केल्या आहेत. यावरून धोंडीराम नामदेव कुंभार व जोतीराव यांच्यामध्ये गुलामगिरीतील सर्व चर्चा व संवाद असवेत. हे पृ. ४४८ वरील तळटीप योजून सूचित केले आहे. असे काही जोतीरावचरित्रविषयक शोध व बोध विष्णुशास्त्र्यांच्या उपलब्ध निबंधमाला ग्रंथातून तळटीपेतूनही काढता येतात. मात्र त्यांच्या स्वत:च्या तळटीपेतूनही उपहास सापडतो. 'मालसे-कीर' यांनी गुलामगिरी पुस्तक समग्र छापले आहे (म. फुले : समग्र वाङ्मय; पृ. ६४-१५०). पण शिष्यवर्य धोंडीराम नामदेव यांची गुलामगिरीच्या मूळ आवृत्तीतील शेवटी छापलेली कविता वगळली आहे. गुलामगिरी पुस्तकाची दुसरी आवृत्ती १९११ साली निघेपर्यंत मागे जोतीरावांची माहिती निबंधमालेवरूनच मराठी वाचकांना होण्याची फक्त सोय होती. जोतीशिष्य 'धोंडीबा' यांचे वर्णन देखील चिपळूणकरांनी उपहासगर्भ भाषेत केले आहे ! (पृ. ४४४)

'ब्राह्मणांचे कसब' ह्या कवितांवर चिपळूणकर यांनी मुळीच भाष्य केले नाही. रिपोर्टाच्या परीक्षणास सुरुवात करताना ह्या पुस्तकातील दोन ओळी फक्त आरंभास उद्धृत केल्या. या दोन ओळी अभंग तीनमधील शेवटच्या आहेत. जोशी शूद्राच्या लग्नात त्यास कसा बुचाडतो याविषयी वर्णन देऊन बुचाडणाऱ्याचे प्रयोजन नाही असे जोतीबा शेवटी म्हणतात. 'कसब' (Priestcraft) या पुस्तकाची दुसरी आवृत्ती अलीकडे निघेपर्यंत या फक्त दोनच ओळी दीर्घकाल निबंधमालेत मराठी वाचकांना उपलब्ध होत्या. गुलामगिरी पुस्तकाला जोडलेल्या इंग्रजी प्रस्तावनेला चिपळूणकर किंवा तत्सम यांनी स्पर्शदेखील केलेला आढळत नाही.

जोतीरावांच्या पुस्तकातून ब्राह्मण समाजाचा उपहास ओतप्रोत आहे व ह्या उपहासाला उपहासच वापरून विष्णुशास्त्री यांनी पहिली जोरदार प्रतिक्रिया केली. स्वत: जोतीबांनी ती लक्षात घेतली व ज्या चुका म्हणून विष्णूशास्त्री यांनी दाखविल्या, त्या त्यांच्या पुढील पुस्तकातून कित्येक वगळल्या असेही अभ्यासकांना आढळेल. उदा., 'असूडाचे निबंध' ह्यामध्ये गुलामगिरी पुस्तकातील विषय व मुद्दे भर घालून विस्ताराने पुन: प्रकट केले.

व्याकरण व शुद्धलेखन यासंबंधी उणिवा आहेत हे जोतीबांनी स्वत: मान्य केले होते (निबंधमाला पृ. ४४३). 'दीनबंधू' च्या संपादकांनी तर व्याकरणदोषांसंबंधी वाचकांची माफीच मागितली होती ! (निबंधमाला पृ. १०२१). जोतीबा व 'दीनबंधू' चे संपादक हे शूद्रांतील पहिले लेखक. त्यांच्याकडून असले दोष होणे शक्य व साहजिक होते. पण ज्या स्वभाषेचा चिपळूणकरांना अभिमान होता, त्या मराठीतच त्यांनी सर्वांना त्यांचे मनोगत मांडता येतील तसे प्रथम मांडिले, एवढे मान्य व्हावे. ही सर्वच सर्वसामान्य मंडळी अल्पशिक्षित होती; पण कळकळ फार मोठी होती.

## चिपळूणकरकृत खण्डण व मण्डण

चिपळूणकरांच्यामुळे मूळ सत्यशोधक समाजाच्या जतन झालेल्या उद्देशात, "शूद्र लोकास नीच मानून गफलतीने लुटीत आहेत" असे वाक्य आहे; व नीच मानण्यास ग्रंथाधार दिले व घेतले जात असत. उत्तर पेशवाईच्या काळात व तिच्या नंतरही अशी परिस्थिती नव्हती असे नव्हे. दादोबा पांडुरंग, डॉ. भाण्डारकर वगैरेंच्या चरित्रांत व रानडयांच्या इंग्रजी लेखांतून व भाषणांतून भरपूर पुरावे मिळू शकतात. शूद्र–क्षूद्र यांना हलके व नीच मानण्याची जो वहिवाट होती, तिच्या विरुद्ध हे बंड होते. शूद्रातिशूद्रांचा उपहास होत होता. ह्या उपहासाची प्रतिक्रिया अधिक कडवट शब्दांत जोतीरावांच्या लेखनाच्या द्वारे प्रथम प्रचितीस आली. शंभर वर्षांनंतर काळ खूपच पालटल्यामुळे हे प्रतिक्रिया व प्रतिउपहासाचे बंड आज शमले आहे. "काही सुज्ञ शूद्र मंडळीनी हा समाज... स्थापन केला" असा उद्देशात उल्लेख आहे व समाज निघण्यास जोतीरावांना निबंधमालाकारांनी जबाबदार धरिले आहे. पण फक्त एकटे जोतीराव समाजाचे संस्थापक नव्हते. इतरही प्रथम शिकलेले शूद्र पुढारी पुण्यास जमले व त्यांनी मिळून एकत्र विचाराने स. शो. समाज स्थापला. भांबुर्डे–हडपसर येथे शाखा निघाल्या. तीनशे–चारशे सभासद झाले. एवढे मनुष्यबळ त्या काळात प्रार्थनासमाजाच्या मागेही उभे राहिले नाही. जोतीराव देहाने मृत झाल्यावरही हा समाज वाढला. मोठमोठ्या परिषदा झाल्या. प्रचारक अनुयायी यांची वाण पडली नाही. ह्या समाजाला पुढे मोठा इतिहास आहे. आता त्याच्या वरील उद्देशाची गरज संपली आहे. म्हणून त्याचे अस्तित्व त्या स्वरूपातच राहिले नाही; वरील काळाप्रमाणे प्रत्यक्षात भासमान होत नाही. स्वतःस वरिष्ठ व उच्च मानणाऱ्या वर्गाकडून होणाऱ्या उपहासाला जोतीरावांनी उपहासात्मक प्रतिक्रिया केली; व ह्या उपहासाला उपहासात्मक उत्तर (प्रतिक्रिया) निबंधमालाकारांनी दिले. क्रियाप्रतिक्रिया अशा वाढल्या व त्या आता शमल्या आहेत. शुद्ध व चांगले व्याकरण व उत्तम मराठी लिहिणारे लेखक शूद्रातिशूद्रांत वाढत आहेत.

"शूद्र लोकांस... सदुपदेश व विद्याद्वारे त्यास त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरता" हा समाज संस्थापित झाला, "शूद्र विद्यार्थ्यास स्कॉलरशिप चालू केल्या" वगैरे विद्याप्रसारक प्रयत्न जे समाजाच्या रिपोर्टांत नमूद केले होते त्यांना पाठिंबा देण्यासाठी चिपळूणकर लिहितात:– "वरील सर्व गोष्टी आमच्या 'सुज्ञ शूद्र मंडळी'ने शहाणपणाच्या म्हणून केल्या आहेत. व आलीकडे इंग्रजी विद्येच्या योगाने जी लोकस्थिति बदलली आहे तीसही त्या प्रायः अनुसरूनच आहेत हे खरे." वर्तमानपत्र काढण्यासाठी समाजास बाराशे रुपयांचा छापखाना "सत्याच्या प्रकाशाचा फैलाव व्हावा" म्हणून दिला गेला त्याचेही स्वागत विष्णुशास्त्री मोकळ्या मनाने करितात. त्यांची ओळ ना ओळ केवळ सर्व उपहासासाठीच खर्ची पडली असेच नव्हे. सर्वच टीका सहानुभूतिशून्य नाही. विरोधासाठी विरोध करणे हा निबंधमालेचा मूळ उद्देश नव्हता.

सत्यशोधक समाजाच्या उद्देशाविषयी आणखी काही निर्णय सांगता येतात. जोतीराव हे एकमेव एकटेच संस्थापक नव्हते. सूज्ञ शूद्र मंडळीनी फक्त शूद्रांना ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये "इत्यादी" लोकांच्या दास्यत्वापासून मुक्त करण्याकरिता समाज काढला. अतिशूद्र (अस्पृश्य) लोकांच्या उद्धाराचा या उद्देशात हेतू नव्हता. म्हणूनच पुढे या समाजाचे रूपांतर फक्त ब्राह्मणेतर (म्हणजे) स्पृश्य शूद्रांच्या चळवळीत झाले. स. शो. समाज वरील सर्व दृष्टीने 'सेक्यूलर' होता. म्हणजे ब्राह्मो व प्रार्थनासमाज यांच्याप्रमाणे आध्यात्मिक (spiritual) नव्हता. म्हणून उत्तरोत्तर तो प्रार्थना समाजापासून अलग पडत गेला. अतिशूद्रांच्या उद्धाराचा यात समावेश नसल्याने अस्पृश्य मानलेल्यांचा समावेश झाला नाही व अतिशूद्रांना त्यांच्या उद्धारार्थ वेगळी स्वतंत्र चळवळ निर्माण करणे भाग झाले. ब्राह्मण–भट–जोशी यापुढे "इत्यादी" हा शब्द आहे. म्हणजे विविध पुरोहित मग ते कोणत्याही जातीचे तत्सम असोत, त्यांच्यापासून सुटका करण्याचा इरादा होता. कित्येक (हिंदू) धर्मग्रंथांत पुरोहितांच्या दृष्टीने मतलबी (स्वार्थी) भाग आहे. व त्या आधारे गफलतीने (शूद्रांस) लुटीत आले







अनुक्रमणिका

आहेत. स. शो. समाजाचा अशा प्रकारे मतलबी ग्रंथांवर रोख होता. हा मतलब गुलामगिरी व ब्राह्मणांचे कसब या ग्रंथांतून स्पष्ट केला आहे. म्हणून ह्या ग्रंथांना ( पुस्तकांना ) महत्त्व आले; व चिपळूणकरांनाही टीका करावी लागली. चिपळूणकरांच्या पुढील वाक्यावर आजही विवेक करणे भाग आहे– "इकडे इंग्रजी झाल्यास......इंग्रजी विद्येचा सर्वांस सारखा लाभ घडत असता शूद्रवर्गापैकी थोडेच विद्यासंपन्न झालेले आढळतील......त्यातून ......कार्यसाधन ग्रंथांचे ज्ञान ज्यास आहे असा धर्मशास्त्री शूद्र तर अद्याप कोणीही ऐकला नाही. ...ग्रंथांचा शेंडा का बुडखा माहीत नाही त्यांची अप्रमाणता समाजातील......आमची 'सुज्ञ शूद्र मंडळी' कोणत्या तऱ्हेने समजून देणार असेल ती असो !" ( पृ. ४५२ )

स्वत: जोतीबांना, हिंदुधर्मग्रंथ संस्कृतमध्ये असल्याने व ते स्वत: 'धर्मशास्त्री' नसल्याने संस्कृत ग्रंथांवर इंग्रजीत ज्या टीका सर जोन्स व प्रो. विल्सन यांनी केल्या होत्या त्यांवर प्रायः अवलंबून राहावे लागले. जोतीबांच्या या पिढीत संस्कृत घेऊन पदवीधर झालेले शूद्रातिशूद्रांत कोणी नव्हते. अर्थात जोतीबा व त्यांच्या वेळचे काही प्राकृत शिष्य यांच्या खंडणात उणिवा राहणार हे नैसर्गिक होते; व प्रतिकारासाठी उपहासगर्भ भाषा फक्त वापरून ह्या उणिवा अर्थात चिपळूणकरांनी दाखविल्या. समाजाने सामुदायिक प्रार्थना रविवारी (प्रार्थना समाजाप्रमाणे ) चालू केल्या; त्या वेळी गावयाची गीते, व लग्न वगैरे विधिसंस्कार जे समाजाने शूद्र लोकांसाठी स्वावलंबनाने चालू केले, त्यासाठी समाजाजवळ त्या वेळी योग्य ते वाङ्मय नव्हते, असे जे विवरण चिपळूणकरांनी केले होते, ते चूक आहे असे आजही म्हणता येत नाही. आजही अधिकार प्राप्त असलेल्या विद्वानांची वाण आहे, केवळ ब्राह्मणांना नावे ठेवून कार्य भागणार नाही, अशी सूचना उपहासात्मक भाषेत का होईना चिपळूणकरांनी केली होती. तीही चूक नव्हती व नाही. हल्ली बौद्ध होऊन कित्येक बौद्ध ( दलित ) विचारवंत ब्राह्मणी धर्म व त्यांचे ग्रंथ यांवर घसरतात. त्यांनीही आपला पाली व संस्कृत ग्रंथांचा अभ्यास केवढा आहे, याचा आत्मपरीक्षणाने विचार करावा. जोतीरावांना मानणाऱ्यांत पुढे कै. भास्करराव जाधव, लठ्ठे, डोंगरे व कर्मवीर शिंदे, पुढे डॉ. आंबेडकर झाले. पण अशी ही विद्वान माणसे जोतीरावांच्या काळात व आताही दलितांसह सर्व ब्राह्मणेतरांत नाहीत, हे मान्य करणे प्राप्त आहे; अधिकारी माणसांची वाण होती व असते. ही भरून आली पाहिजे.

एका टीपेत सत्यशोधक वक्तृत्वसमारंभात कै. डॉ. विश्राम रामजी घोले यांनी जे भाषण केले व जे पुढे ज्ञानप्रकाशात आले होते त्याविषयी उल्लेख निबंधमालेत आहे ( पृ. ४५३ ) व डॉ. विश्राम यांच्यासारखी बहुश्रुत मंडळी देखील त्या वेळी सत्यसमाजात नव्हती. अर्थात डॉ. विश्राम यांनाच समाजाचे अध्यक्ष करणे जोतीराव व इतर सुज्ञ शूद्र मण्डळींना भाग पडले.

चिपळूणकरांची टीका सर्वथा न्याय्य आहे असे येथे प्रतिपादण्याचे हेतू नव्हते. उदा, कै. अण्णासाहेब (हरि गणेश पटवर्धन) यांनी समाजास देणगी दिली व समाजाने त्यांचा रिपोर्टात गौरव केला. या गृहस्थांना कलुषा व त्रिंबकजी ढेंगळे यांच्या कोटीत घालून त्यांचा वैयक्तिक समाचार घेतला, त्याची जरूरीच होती किंवा कसे ? छिद्रान्वेषण म्हणजेच 'पुस्तक परीक्षण' म्हणणे कठीण वाटते.

कितीही केले तरी चिपळूणकर व फुले ही माणसे होती. मनुष्य म्हणजे काही चुका आल्याच. म्हणून पूजकांनी विभूतिपूजा न करिता चिकित्सा करणे, हे पुढे जाण्यास उपकारक ठरते. दोघांनाही पुढे परंपरा लाभल्या. फुले यांच्या प्रवाहास शाहूमहाराज पुढे भेटले व चिपळूणकर यांना टिळक येऊन मिळाले. महाराष्ट्राच्या इतिहासात "मालाकार व फुले" यांचे स्थान ध्रुव राहील. विद्यालये व महाविद्यालये यांमधून हे सर्व विषय आता समावेशित झाले असल्यामुळे अभिनिवेष वगळून तटस्थ बुद्धीने यांचा अभ्यास नव्या पिढीपुढे ठेविला जाणे युक्त आहे. चिपळूणकरांची झुंज फुल्यांशी का जुंपली ? तिचा महाराष्ट्रावर काय परिणाम झाला ?

### 'ज्ञानोदय', 'सत्यदिपिका' व 'निबंधमाला'

निबंधमाला वर्ष ४ थे, अंक ४८ यामध्ये प्रारंभी सामान्य आक्षेप ह्या 'ज्ञानोदय', 'दीनबंधु',

अनुक्रमणिका






'निबंधमाला' या सदराखाली चिपळूणकरांनी आत्मनिवेदन केले आहे. प्रत्येक वर्षापूर्वी असे निवेदन पुढे मागेही आले आहे. ह्या निवेदनातून विष्णूशास्त्री यांचे आत्मवृत्त व स्वभाव दर्शविणारा चरित्राचा काही भाग प्रकाशित झाला आहे. हा महत्त्वाचा आहे.

मालसे–कीर संपादित 'महात्मा फुले : समग्र वाङ्मय' (आवृत्ती पहिली) ह्या ग्रंथात सत्यशोधक समाजाची तिसऱ्या वार्षिक समारंभाची हकिकत म्हणून मूळ रिपोर्ट पुनः छापला आहे. त्यात पृ. १५७ परिच्छेद १९ मध्ये "सत्यदीपिका, सुबोधपत्रिका आणि ज्ञानप्रकाश" ह्या तीनच वर्तमानपत्रांचा आभारार्थ उल्लेख आलेला आहे. ज्ञानोदयाला निबंधमालेने धारेवर धरले आहे. पण ज्ञानोदयाचा उल्लेख वरील पुनर्मुद्रित स. शो. रिपोर्टात नाही. मालाकारांनी जोतीरावांवर जी टीका केली त्याचे एक कारण असे होते, की जोतीराव यांचा 'ज्ञानोदय'– पत्रापेक्षा 'सत्यदीपिका' यांच्याशी मैत्रीचा व सहकार्याचा संबंध होता. 'ज्ञानप्रकाश' व 'सुबोधपत्रिका' ही ख्रिस्ती पत्रे नव्हती, म्हणून यांचा समाचार निबंधमालेला तिच्या स्वधर्माभिमानी धोरणानुसार घेण्याची जरुरी पडली नाही. नाहीतर स. शो. समाजाची वृत्ते पहिल्यापासून सुबोधपत्रिकेने व ज्ञानप्रकाशानेही छापली होती. जोतीरावांच्या शाळेची वृत्ते छापण्यात तर 'ज्ञानप्रकाश' पहिला व जेष्ठ होता. ज्ञानोदयातील सर्वच शाळावृत्ते फुलेचरित्रकर्ते श्रीमान धनंजय कीर यांनी आधारार्थ घेतली आहेत.

'ज्ञानोदय' व चिपळूणकर यांची गाठभेट निबंधमालेच्या आठव्या अंकात पूर्वीच पडली होती. या लेखाच्या पूर्व भागात 'पुणे वर्णन', 'घाशीराम कोतवाल' ह्या पुस्तकांवर चिपळूणकरांच्या टीकेचे कारण दिले होते. "आमचे मुख्य प्रतिपक्षी व परंपरागत चालत आलेले वैरी जे ख्रिस्तोपासक" अशा वडिलार्जित दृष्टीतून चिपळूणकर ज्ञानोदय व सत्यदीपिकेकडे पाहत होते. मालेच्या दुसऱ्या वर्षाच्या निवेदनावरून देखील हे जाणता येते. "आमच्या देशातही मिशनऱ्यांनी मूर्तिपूजेच्या नावाने शतशः आरोळ्या मारल्या असल्यामुळे तेच तुणतुणे पुढे ब्राह्मोनी, सामाजिकांनी, दयानंद भक्तांनी व शेवटी सत्यशोधकांनीही चालवलेले आढळते" (पृ. ८९० ). चिपळूणकरांना ही अनुकरणे नको होती. चिपळूणकर मूर्तिपूजावादी होते; त्यांना परंपरेचा दाण्डगा अभिमान होता.

जोतीराव व त्यांचे गुलामगिरी पुस्तक यांचा चिपळूणकरांना लोकहितवादींवर लिहितानाही विसर पडला नाही. अन्य दुसरा कोणताही विषय असो, त्यातूनही जोतीराव निबंधमालेच्या मनातून जात नाहीत. "...... येवढे शूद्रांचे कैवारी रा. जोतीराव व एवढी त्यांची बृहत्संहिता 'गुलामगिरी', पण आकाशातील बापाच्या पवित्र लेकरांनी जेथे तेथे जो कंठस्नानाचा पवित्र विधि आचरलेला आढळतो ... " ( पृ. ११७९ ). अंकित अनार्य व जेते आर्य यांच्या संबंधावर लिहिताना 'लोकहितवादी' वरील टीकेत चिपळूणकर म्हणतात "...... परद्वीपस्थांचे ज्ञाननेत्र उसने घेऊन त्यावरून लिहिणार नाही." ( पृ. ११७८ ). "... ... 'लोकहितवादी', 'गुलामगिरीकार', 'सत्यदीपिका' धारी असे आज नवब्रह्मनिष्ठ उदयास येऊन त्यांनी हे कितीका काळाचे ब्राह्मणांचे बंड मोडून ते पुरंदरच्या बंडाच्या भेटीला पाठविण्याचा स्तुत्य उद्योग सुरू केला आहे !" ( पृ. ११७६ ). आर्य इराणातून आले हा विचार शतपत्रांत लोकहितवादींनी जोतीरावांच्या अगोदर मांडला होता.

सत्यदीपिकाकर्ते बाबा पदमणजी, लोकहितवादी व जोतीराव हे तिघे मूळ परमहंस सभेत प्रत्यक्षाप्रत्यक्ष होते. म्हणून लोकहितवादी–बाबा पदमणजी व फुले यांची ओळख होती; मैत्री होती. रे. मरे मिचेल हे देखिल तिघांच्या चांगल्या परिचयाचे होते. लोकहितवादींच्या शतपत्रांत पुढील गुलामगिरीतील कित्येक विधाने अगोदरच प्रसिद्ध झाली होती. त्यांचे खण्डण चिपळूणकरांनी गुलामगिरीनंतर केले असले तरी खण्डणाची धर्ती व उपहासाचा प्रकार तोच सापडतो. 'ब्राह्मणांनी आपली विद्या लपवून ठेवली' वगैरे गुलामगिरीतील विधाने शतपत्रांत आहेत. शतपत्रे व गुलामगिरी ही भावंडेच होत, असा चिपळूणकरांचा अभिप्राय व्यक्त झाला. जोतीरावांवर टीका करण्यात जी कारणे मालाकार यांनी पुढे केली आहेत, तीच लोकहितवादींवर ( व







अनुक्रमणिका

इतर सुधारकांवर ) टीका व उपहास करण्यास कारणीभूत झाली. लोकहितवादींचा ब्राह्मणांवरील हल्ला जोतीरावांच्या हल्ल्यापेक्षा तुलनेने प्रखर होता. हे दोन्हीही समान हल्ले परतवून लावण्याचे कार्य निबंधमालाकारांस करावे लागले. न्या. रानडे ( व प्रार्थना समाज ) यांच्यावर चिपळूणकरांनी जी टीका केली आहे, तिची कारणे वरीलसारखीच दिसतात. मात्र फुल्यांवर चिपळूणकरांचा राग अधिकाअधिक होता. जोतीबात ब्राह्मणविरोध सर्वांपेक्षा विलक्षण होता. ह्यासाठी जोतीबांनी संघटना बांधली होती. जोतीबांना शिवराळ ठरविता ठरविता स्वत: चिपळूणकर शिवराळ झाले. उदा., एक-दोन उल्लेख पहा. "... पण त्या सर्वांनी [जोतीबापुढे] निवळ झक मारली ! ..." (पृ. ४४५). जोतीरावकृत 'गुलामगिरी' पुस्तकाचा हलकट ग्रंथ म्हणून तळटीपेत निर्देश केलेला आहे (पृ. ३९६).

"विठोबा वगैरे देवांच्या संरक्षणार्थ जितकी मंडळी गोळा होईल, तितकी प्रार्थनासमाजमंदिराच्या किंवा दयानंदस्वामी, जोतीबा फुले यांच्या पुतळयांच्या बचावाकरता जमेल काय? ... ब्रह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज, सत्यशोधक समाज यांच्या दप्तरांतील पटावर कितीशी नावे उरतील बरे ? " (पृ. ८५७). अशी आता चिपळूणकरांची खरी झालेली काही भाकिते मोठी चिंत्य ठरतात. काही भविष्ये खोटी ठरली. उदा., दयानंद व जोतीबा यांना त्यांच्या पश्चात पुष्कळ चाहते प्राप्त झाले आहेत.

उत्तर हिंदुस्थानात आर्यसमाज आजही कार्यकर्ता दिसतो; पण बाकीच्या वरील तिन्ही समाजांची आज अवस्था ठीक नाही ! एवढे कबूल व्हावे. जोतीराव अमर राहिले आहेत पण स. शो. समाज व त्याच्या निघालेल्या शाखा नाहीत !! निश्चित घटना, कार्यक्रम, संघटणा व नवे ध्येयधोरण दिसत नाही. जोतीरावांचे अनेक पुतळे झाले आहेत. त्यांना आता विरोधही उरला नाही. दयानंद, राममोहन व फुले यांच्याविषयी आस्था बाळगणारे या देशात आहेत व पुढेही असतील. त्यांनी मालाकारांची टीका अभ्यासावी. यामुळे लाभच होणारा आहे. म्हणूनही हा विषय येथे हाती घेतला. निबंधमालेच्या काळात जी अव्वल इंग्रजीतील परिस्थिती होती, ती आज नाही. तरी मालाकारांचे सर्वच्या सर्व विचार कालबाह्य झाले नाहीत. निबंधमाला हा एक ज्ञानकोश व ज्ञानसंग्रह आहेच व पुढेही राहील. निबंधमालेची सर्वच्या सर्व टीका (व उपहास देखील) अप्रमाण मानण्याचे यापुढे कारण नाही. किंवा सर्वथा सर्वांशी प्रमाण मानणे, हे देखील सांप्रदायिक एकपक्षीय बुद्धीचे द्योतक ठरेल. "मालाकार व फुले" यांचे समर्थन वा खंडण करिताना तोल सांभाळण्याची जरुरी वाढत जाणार आहे. मराठी भाषेची त्यांच्या वेळची स्थिती व तिची सुधारणा ह्या उद्देशाने निबंधमाला निघाली, पण तिला इतरांचे खंडण करण्याचे खड्ग हातात घ्यावे लागले. याची कारणे तपासण्याचा येथे उद्देश होता. यासाठी फक्त निबंधमालाकारांचा सत्यशोधक रिपोर्टावरील अभिप्राय व दीनबंधूचे उत्तर एवढाच भाग अपुरा पडतो. बहुतेकांनी फक्त रिपोर्टावरील टीका लक्षात घेतली. पण हा प्रयत्न वेगळा आहे. निबंधमालेत ह्या टीकेचे ( उपहासाचे ) धागेदोरे—सोईरसंबंध व पदर तिच्यामध्येच मागेपुढे लागलेले व असलेले दिसतात. त्यांचे येथे साह्य घेतले आहे. निबंधमालेतील "वक्तृत्व", 'मोरोपंतांची कविता' आणखी इतर ठिकठिकाणी चिपळूणकरांच्या पुढे जोतीबा उभे राहिलेले सर्वत्र आढळतात. ही विरोधोभक्तीच होय. निबंधात जोतीरावांवरील टीकेचे अनेक संदर्भ सापडतात, यामुळे स. शो. समाजाचे ध्येय–धोरण व उद्देश समजण्यास मदतही होते. उदा., "... येथील ( पुण्यातील ) जुने वैभव गेल्यापासून आज सुमारे आठ वर्षे मोठ्या थाटाची स्वारी (दयानंदांची) जी कोणाच्या कधी दृष्टीस पडली नव्हती, व पुढेही कधी पडण्याचा योग नव्हता ती सत्यशोधकांच्या व आर्यसमाजवाल्यांच्या हौसेमुळे सर्वांस अनायसे पाहावयास सांपडली." (पृ. ३५१). सत्यशोधक मण्डळी दयानंदांची ब्राह्मणभटविरोधी भाषणे ऐकण्यासही उपस्थित असत. दयानंद व स. शो. समाज यांचे सहकार्य का झाले, याची कारणेही निबंधमालेच्या टीकेतून शोधण्यासारखी आहेत. आर्यसमाज व सत्यशोधक समाज यांच्यामध्ये तात्त्विक सादृश्य मुळीच नाही, असेही नाही. चिपळूणकर–फुले या दोघांचीही विवेचने काही

अदृश्य मुद्द्यांना दृष्य करितात. मूळचा सत्यशोधक समाज एकेश्वरवादी होता.

दयानंदांनी एकेश्वरवादाच्या अधिष्ठानावर जो वेदार्थाचा यत्न केला, तो खुद्द एकेश्वरी संस्कृत पंडित डॉ. भाण्डारकरांनीही अमान्य केला. सत्य तेवढे घ्यावे व असत्य टाकावे असा विवेक व नियम वेदप्रामाण्याधिष्ठित आर्यसमाजाला पुढे जरूर ठरला. स्वतः चिपळूणकर कोणाचेही चेले नव्हते (पृ. २१). व त्यांची सर्वच पुस्तक-परीक्षणे व इतरही लेखन यांचा पाया बुद्धी व चिकित्सा हाच होता (पृ. ४००). ब्राह्मण समाज व ब्राह्मणी धर्म यांच्यावर जे हल्ले करीत होते, मग ते कोणीही असोत, त्यांचा सर्वांचा प्रतिकार उपहासाने त्यांनी केला.

तथापि दयानंदसरस्वतींच्या दर्शनाचा व श्रवणाचा प्रत्यक्ष लाभ मालाकारांस घडला नाही (पृ. ६३०). त्याचप्रमाणे जोतीरावांच्या प्रत्यक्ष सहवासाचा लाभ त्यांनी कधीच प्राप्त करून घेतला नव्हता. आर्यसमाज व सत्यसमाज फार काळ टिकणार नाहीत वगैरे तत्सम त्यांची काही भाकितें अर्थात खोटी ठरली. या समाजांचे कार्य म्हणजे प्रथक इतिहास झाले आहेत. ब्राह्मोसमाजाने तर देशाला मोठमोठे कर्ते पुढारी व राजकीय नेतें दिले. दयानंद व जोतीबा यांची कीर्ती वर्धमानच राहिली आहे. जोतीबांची लेखणी धारदार का झाली व चिपळूणकरांच्या लेखणीला नंतर यामुळे धार का आली ? याची कारणे विभिन्न झाली. क्रिया व प्रतिक्रिया झाल्या.

'सत्यदीपिका' व 'ज्ञानोदय' यांनी निबंधमालाकार सरकारावर व ख्रिस्ती धर्मावर टीका करितात असा आक्षेप घेतला होता (पृ. ६५४) व वरील दोन पत्रांशी मालाकारांचे विरोधी नाते होते, व ह्या दोन पत्रांशी जोतीराव व त्यांचा सत्यशोधक समाज हितचिंतक व मित्र म्हणून पाहात होता. मालाकार या दोन ख्रिस्ती पत्रांना हाडवैरी व शत्रू म्हणून समजत होते (पृ. ३५२). अर्थात निबंधमाला व फुले-'दीनबंधु' यांच्यामधील सख्य व मैत्री अशक्य झाली. मालाकारांच्या विरोधाला हे एक मोठे उघड व जाहीर कारण होते. मिशनऱ्यांचे व परकीय सरकाराचे आक्रमण चिपळूणकरांना बिलकूल खपत नव्हते.

जोतीरावकृत 'ब्राह्मणांचे कसब' ह्या पुस्तकातील फक्त दोन ओळी "ब्राह्मणांचे एथे नाही प्रयोजन । द्यावे हाकलून जोती म्हणे ॥" स. शो. समाजाच्या रिपोर्टच्या परीक्षणाच्या वरती उद्धृत केल्या आहेत. यापेक्षा जास्ती 'ब्राह्मणांचे कसब' पुस्तकाला त्यांनी स्पर्श केला नाही. या काव्याला बाबा पदमणजी यांची छोटी प्रस्तावना आहे. B. P. म्हणजे बाबा पदमणजी असे श्रीमान धनंजय कीरही मान्य करितात. हेच बाबा पदमणजी "सत्य दीपिका" संपादित होते. रे. मरे मिचेल व जोतीराव यांच्या संबंधावरही श्रीमान धनंजयराव कीर यांना प्रकाश टाकावा लागला.

निष्कर्ष निघतो, की देशी व परदेशी मिशनरींशी संबंध व इंग्रजी राज्यावरील निष्ठा या दोन कारणांमुळे फुले व स. शो. समाज ह्यांवर चिपळूणकरांनी लेखणीचे हत्यार चालविले. स्वदेश व स्वधर्माभिमान ( हिंदु परंपरेचा अभिमान ) हा निबंधमालेचा राजकीय पाया होता. दीनबंधू व जोतीबा यांची दृष्टी वर्गीय होती. येथे चिपळूणकरांचे शब्द व वाक्यांश अवतरणात घेऊन चिपळूणकरांचे दर्शन त्यांच्या शब्दांत करून दिले आहे. 'दीनबंधू' हे पत्र पुणे येथे १ जानेवारी १८७७ पासून कै. कृ. पां. भालेकर यांच्या संपादकत्वाखाली निघू लागले. हे शूद्रातिशूद्रांचे पहिले मुखपत्र होते.

## दीनबंधूच्या उत्तराला उत्तर

"'दीनबंधू' हे एक लहानसे वर्तमानपत्र 'सुबोधपत्रिका', 'आर्यपत्रिका' प्रमाणे आपल्या समाजाच्या तर्फेने निघालेले आहे." अशी ओळख चिपळूणकरांनी करून दिली. ज्या समाजाच्या संस्थापकावर व समाजावरही ४४ (व्या) अंकात निबंधमालेने टीका केली होती, तिला 'दीनबंधू'ने उत्तर दिले. ह्या उत्तराला उत्तर चिपळूणकरांनी दिले. सत्यशोधक समाजाचा पंथ म्हणून आरंभी उल्लेख केला. "गुलामगिरीचे येवढे निरुपण करण्याचे मुख्य कारण हेच की, आमचे बिचारे शूद्रबंधू अद्याप केवळ अज्ञान व भोळे असल्यामुळे 'झुकानेवाला चाहिये' या न्यायाने कोणासही त्यांच्या मनात हव्या त्या मूर्ख कल्पना भरवून देता येणार आहेत." (पृ. १०१९). गुलामगिरीवर टीका करण्याचे कारण विष्णुशास्त्री यांनीच स्वतः दिले असल्यामुळे



अनुक्रमणिका

माननीय धनंजय कीर यांनी फुले चरित्रात कृष्णशास्त्री यांच्या चारित्र्यहननाचे जे कारण अभिप्रेत धरिले आहे ते अर्थात गौण, दुय्यम मानावे लागते. नाइलाज आहे. इतःपर 'फुले-चिपळूणकर' हा विषय मूलभूतपणे पाहावा. दोघांची विधाने तपासली जावीत. ह्यासाठी त्यांचेच आधार प्रमाण मानावे लागतात.

चिपळूणकरांच्या टीकेला आचार्यांच्या तर्फेने (फुल्यांच्या वतीने) उत्तर देण्यात आले; ह्या उत्तरात चार मुद्दे आहेत. दीनबंधूचा हा मूळ अंक आता कोठेही उपलब्ध होण्यासारखा नाही. म्हणून दीनबंधूतील ह्या चारी मुद्द्यांवर जे परिच्छेद चिपळूणकरांनी उद्धृत केले आहेत, तो सर्व हा भाग निबंधमालेमुळे आज शिल्लक व उपलब्ध राहिला आहे; व त्यावरून काही निष्कर्ष काढण्यास वाव साधार सापडतो, म्हणूनही चिपळूणकरांचे हे उत्तराला उत्तर महत्त्वाचे मानावे लागते. ह्या उत्तरात विवेकाला उतरणारा बराच भाग सापडतो.

जोतीरावांच्या व दीनबंधूच्या "वेड्या बागड्या" भाषेविरुद्ध तक्रार करणे, हे चिपळूणकरी टीकेतील सूत्र होते. पण चिपळूणकरांच्या भाषेबद्दल खुद्द निबंधमालेच्या काळातच उलट व विरोधी टीका होत होती हे मालेतील खुद्द तळटीपेतील त्यांच्या विवरणावरून समजू शकते. (पृ. १०१७)

चिपळूणकरांच्या पश्चातही त्यांच्या मराठी भाषेवर विरोधी लिहिले गेले व जाते, हा विषय वेगळा. दीनबंधूच्या उत्तरात जी भाषा उपलब्ध आहे, ती अर्थात स्वतः जोतीरावांची नाही. जोतीरावांची स्वतःची वेगळीच भाषासरणी (style) आहे व ती निश्चितपणे जाणता येते. ती दडत नाही.

मालाकारांना पाणउतारा करावासा वाटला तर ते करितात व तारीफ कराविशी वाटली तर तारीफ करितात, असा दीनबंधूचा पहिला मुद्दा होता. परंतु जोतीरावांवर, सत्यशोधक समाजावर व दीनबंधूवर चिपळूणकरांनी जे लिहिले त्यात पाणउतारा (उपहास) फक्त नाही. काही तारीफही आहे, हे दृष्टिआड होऊ नये, म्हणूनही सर्वच उत्तर महत्त्वाचे आहे. उदाहरणार्थ—

"... शूद्रांचे दुःखाक्रोश सर्व व्यर्थ असून त्यांच्या स्थितीत सुधारणा करण्याची बिलकूल गरज नाही, असे आमचे मुळी म्हणणे नाही..." हे 'दुःखाक्रोश' अर्थात गुलामगिरी पुस्तकात आहेत. जोतीबांनी शूद्रातिशूद्रांची दुःखे सर्वात अगोदर व्यक्त केली.

### श्री. दयानंद व फुले

श्री. दयानंदांची विद्वत्ता व फुल्यांचा ग्रंथविषयक अधिकार (ज्ञान) यांची चिपळूणकरांनी जी तुलना केली आहे, ती मनोवेधक आहे (पृ. १०२५). फुल्यांनी त्यांच्या शक्तीबाहेरची कार्ये हातात घेतली; ती त्यांना घ्यावी लागली. दुसरा त्यांच्या एवढाही अधिकारी (ज्ञानी) माणूस त्यावेळच्या शूद्रांत (बहुजनसमाजात) अर्थात दुसरा कोणीही नव्हता. यद्यपि आजही धर्मशास्त्रज्ञ व संस्कृतज्ञ माणसे जवळजवळ नाहीतच, हेही आत्मपरीक्षणाने मान्य व्हावे. आंबेडकरांनंतरही दलितांत (अतिशूद्रांत) संस्कृतज्ञांची हीच वाण आहे. कोणत्याही चळवळींना अधिकारसंपन्न माणसे लागतात. स्वतः दीनबंधूने देखील मान्य केले आहे. उदा., "त्यांची (फुल्यांची) भाषा जरी कडक दिसते, व पूज्य मानलेले पुराण आणि त्यातील नामधारी देव यांविषयी त्यांनी अति निर्भत्सना केली आहे." गुलामगिरीत निर्भत्सना झाली म्हणून चिपळूणकरांनी निर्भत्सनेला निर्भत्सनेने उत्तर दिले, हेही खरे मानावे लागते. पण दोघांचेही ध्येय 'निर्भत्सना' हे नव्हते. दीनबंधूने जोतीबांच्या गुलामगिरी पुस्तकाचा पुढीलप्रमाणे उद्देश सांगितला आहे. "...त्यांचा (फुल्यांचा) हेतु अज्ञानाचे आवरणापासून लोकमुक्त व्हावे एवढाच आहे..." "एवढाच" उद्देश चिपळूणकरांनी शेवटी लक्षात घेतलाही आहे. उदा., "आमच्या (चिपळूणकरांच्या) देशबंधूंवर जातिभेदाच्या संबंधाने वगैरे जी दुःखे खरोखर येत असतील ती हलकी करणे... नाहीशी करणे हे प्रत्येक देशहितेच्छूचे कर्तव्य आहे..." जोतीबांनी त्यांच्या पुस्तकातून शूद्रांची दुःखे मांडली आहेत. ती जर शोधून विचारात घेतली तर आज त्यांपैकी बऱ्याच दुःखांची तीव्रता राहिलीच नाही. चिपळूणकर व फुले यांचा काळ आज कालबाह्य आलेला आहे. कालबाह्यता बाजूस ठेवून दोघांतील सत्ये स्वीकारणे, हे आजच्या व उद्याच्या पिढीचे कर्तव्य राहते. दयानंदांचे खंडण



अनुक्रमणिका

सनातनी पंडितांनी स्मृतिपुराणांच्या आधारे करण्याचा प्रयत्न केला. तसा प्रयत्न फुल्यांच्या बाबतीत होऊ शकत नाही, असे चिपळूणकर म्हणतात. फुल्यांनी त्यांच्या विचारांना पाश्चात्त्य विद्वानांचे शोध हा पाया धरिला आहे. दयानंद व फुले यांच्यांत मूलभूत हा फरक आहे. फुल्यांना व चिपळूणकरांना मानणे म्हणजे त्यांची ओळना ओळ खरी मानणे कोणासही अशक्य आहे. कागदी पुस्तकापेक्षा जोतीबांच्या कृतीचा व कार्याचा अन्वयार्थ जास्ती महत्त्वाचा ठरतो.

दीनबंधूने चिपळूणकरांनी जोतीबांवर विरोधी टीका का केली याचा पुढीलप्रमाणे (तर्क) कयास केला आहे– जोतीबांनी "चित्पावनांचे उत्पत्तीविषयी लिहिले आहे, तेव्हा आपले ज्ञातिसमुदायास दोष दिलेले मालाकारास सहन झाले नसतील." "दयानंदजींच्या संबंधाने मजकूर लिहिल्याने साऱ्या ब्रह्मवृंदास आम्ही दुखविले असेही म्हणायला पाहिजे असे उत्तर देऊन केवळ जातीच्या संदर्भाने व पायावर चिपळूणकरांची टीका नव्हती. लोकहितवादी दयानंद– रानडे–मोडक वगैरे ब्राह्मणसमाजात जन्म पावलेल्या अनेक मोठ्या व्यक्ती देखील चिपळूणकरांच्या उपहासास पात्र झाल्या आहेत. जोतीबा व त्यांच्या पाचपन्नास शूद्र अनुयायांवर टीका केली म्हणजे सर्वच्या सर्व गरीब बापड्या शूद्र वर्गावर चिपळूणकरांनी टीका केली नाही, असा बुद्धिवाद मालाकार मांडतात. जोतीबानंतरही व त्यांच्या ह्यातीत होते. सर्वच्या सर्व ब्राह्मणेतर समाज त्यांचा किंवा सत्यसमाजाचा अनुयायी कधीच झाला नाही. सनातनी सर्वांत होते; व आहेत.

"...ब्राह्मण म्हणजे सर्वच अत्यंत सुजन आहेत व त्यांत दोष म्हणून सापडावयाचा नाही.... आमच्या ज्ञातीचे जे काही वास्तविक दोष असतील ते सर्व आम्हास कबूल आहेत...." वगैरे. दीनबंधूच्या उत्तराला उत्तर देताना चिपळूणकरांनी हा जो उपसंहार केला आहे, तो आजही सर्वांना चिंत्य ठरावा (पृ. १०२५).

जोतीबांचा दुसरा व शेवटचा अवतार (परिवर्तन) म्हणजे स. शो. समाजाची स्थापना व प्रचार होय. दुसऱ्या अवतारामुळेच जोतीबा ब्राह्मणेतरांचे पुढारी म्हणून गणिले गेले. मालाकारांनी सत्यशोधक समाजाच्या रिपोर्टावर लिहिताना समाजाचा उद्देश उद्धृत केला होता. या लेखात तो घेतला आहे. त्या उद्देशात राजकारण वर्ज्य समजावे हा एक स. शो. समाजाचा पवित्रा होता. १८५७ च्या आधीपासून सशस्त्र उठावाचे राजकारण येथे चालू होते. निबंधमालाही इंग्रजांवर पुढे टीका करू लागली. पण दीनबंधूची दृष्टी वेगळी होती. दीनबंधु लिहितो:– "ईश्वरकृपेने या देशावर इंग्रजी राज्य झाले म्हणूनच आज पुढारी ज्ञातीशिवाय इतरास काही तरी ज्ञान प्राप्त होऊन आपले हक्क कळू लागले आहेत." जोतीरावात, दीनबंधूत व एकूण पुढील निघालेल्या व वाढलेल्या ब्राह्मणेतर चळवळीत इंग्रजांविषयी राजनिष्ठा-कृतज्ञता दिसली व वारंवार आढळली व जी चिपळूणकर (व टिळकांनाही) नापसंत होती. यामुळेही दोन्ही प्रवाहांत अंतर पडून पुढेमागे संघर्ष झाला. "भूतांनी नाडलेले, दारिद्र्याने पिडिलेले आणि अज्ञानात गढलेले गाई बापडे" शूद्र निबंधमालेच्या काळात होते. यांची सुधारणा "मालाकारास अगदी आवडत नाही", अशी समजूत दीनबंधु व त्याच्या नंतर वाहत आलेल्या प्रवाहात आढळते. मालाकारास "दीर्घद्वेषी, गुप्तद्वेशी व मतलबी" असे दीनबंधूने संबोधिले आहे. हाच सारखा अभिप्राय सर्वच ब्राह्मणसमाजासंबंधी जोतीराव-दीनबंधु व त्यांच्या अनुयायांत शेवटपर्यंत उमटला! आता तो निमाला. जोतीराव व चिपळूणकर दोघेही ब्राह्मण समाज व ब्राह्मण्य यांत फरक करीत नव्हते.

सत्यशोधक समाजाच्या रिपोर्टावर लिहिताना मालाकारांचा रागच जास्ती प्रगट झाला होता; पण दीनबंधूच्या उत्तराला उत्तर देताना त्यांनी विवेक व सामंजस्य पुष्कळ वापरले आहे; व आता काळही फार पालटला आहे. तो केवढ्या प्रमाणात पालटला व केवढ्या प्रमाणात पालटला जावयास पाहिजे, याचा विवेक फुले व चिपळूणकर यांच्या सांप्रदायिक चाहत्याने करावा. शताब्दीचे प्रयोजन हेच असू शकते. "ज्ञान भांडारात किल्ल्या त्यांच्या (ब्राह्मणांच्या) कंबरेला आहेत." असे अहंकाराने त्या काळानुसार चिपळूणकर म्हणाले. इंग्रज व पाद्रीसाहेब यांचा अंमल आज नाही. जोतीरावांना ज्या मर्यादा त्यांच्या काळानुसार पडल्या त्या आज


अनुक्रमणिका

माहीत. दोघांनाही त्यांचे त्यांचे समर्थक भेटले व भेटतील. या समर्थकांच्याही समर्थनाचा फेरविचार व्हावा; चिकित्सा व्हावी. स्वतः लोकहितवादी व फुले यांना निबंधमालेने एकाच कोटीत गणिले आहे. (निबंधमाला पृ. ११४७).

वितुष्ट न वाढविता कार्यसाधकांनी त्यांचे कार्य जरूर साधून घ्यावे हे एक सूत्र व मार्ग चिपळूणकरांनी सांगितला होता. परंतु चिपळूणकरांच्या फुल्यांवरील टीकेंचे दुष्परिणाम महाराष्ट्रावर फार झाले. फुल्यांची जी वैगुण्ये चिपळूणकरांनी सांगितली तीच परंपरावादी व सवंच समाजातील सनातन्यांनी गिरविली व फुल्यांनी ब्राह्मण व त्यांचे ग्रंथ यांच्यावर जे आक्षेप घेतले तेवढेच भर घालून सत्यशोधकांनी प्रचारिले ! दोही बाजूने तटस्थ विवेक झाला नाही.

फुले-पुतळा प्रकरणाच्या काळात तोंड लागून "फुले–चिपळूणकर व टिळक" यांची मनस्वी निंदा झाली. पण आता १९८४ सालात आपण स्वातंत्र्यात आहोत तरी शूद्र व अतिशूद्र ( दलित ) यांनी चिपळूणकरांनी दीनबंधूच्या टीकेस उत्तर देताना जो उपसंहार केला आहे तो पूर्वग्रहदूषितपणा टाकून अभ्यासावा. महाराष्ट्रातील आजची व उद्याची वितुष्टे व त्यांचे स्वरूप आज वेगळे आहे; व उद्याच्या संघर्षाचे स्वरूप वेगळे राहील !

"या आर्यभूमीचा आजपर्यंत सान्या जातींनी जसा अभिमान बाळगला तसाच पुढेही बाळगून आपआपसात वितुष्टे वाढू न देण्याविषयी जर तजवीज ठेवतील, तर अजूनही आमची स्थिती सुधारेल." ही जी दीनबंधूच्या उत्तरास उत्तर देण्याच्या शेवटी मालाकारांनी प्रार्थना केली, ती येथे पुनः वाचकापुढे ठेवितो.

परकीय सरकार, मिशनरी यांच्याबरोबर व राजकीय सुधारक यांच्या बरोबर चिपळूणकर झुंजले. चिपळूणकरांच्या पुढे अखिल हिंदुस्थानचे अव्वल इंग्रजीतील राजकीय चित्र होते. चिपळूणकरांना देशाचा व विशेषतः परंपरागत हिंदू रूढ धर्माचा उग्र अभिमान होता. चिपळूणकर म्हणजे निबंधमाला व जोतीराव म्हणजे गुलामगिरी (पुस्तक) असा अर्थ जोतीरावांचे इतर समग्र वाङ्मय उपलब्ध होण्यापूर्वी होता. पुस्तकपरीक्षणे, साहित्य व काव्यशास्त्र इत्यादी प्रकारे अर्थात जोतिबांचे वाङ्मय लक्षात घेणेइतपत विकास पावले नव्हते. हा हेतूच त्यांचा नव्हता. निबंधमालेचा मूळ हेतू साहित्यिक होता. फुले व चिपळूणकर यांच्यात पुनरुक्त्या पुष्कळ आहेत.



## आमच्या देशाची स्थिती

ह्या चिपळूणकरांच्या महत्त्वाच्या निबंधावर बंदी घातली होती. स्वातंत्र्यात आता तो मुक्त आहे. निबंधमालेचा प्रधान आशय व उपसंहार या निबंधात आढळतो. ह्या लेखात चिपळूणकरांनी निबंधमालेत निरनिराळ्या संदर्भाने जोतीराव यांच्यावर वेगवेगळ्या विषयांवर विचार मांडताना प्रहार केले आहेत. शेवटचा हा निबंध देखील अपवाद नाही. स्वतः चिपळूणकर सत्यान्वेषक होते. बुद्धिप्रामाण्यवादी होते, म्हणून प्रतिक्रियावादी देखील होते. कोणाच्याही प्रतिक्रिया अभ्यासल्या जाव्यात. चिपळूणकरांचा कोटीक्रम ह्या निबंधात तरी जास्ती चित्य वाटतो.

"सत्यशोधक" हे नामाभिधान घेणाऱ्या व्यक्तीचे वा समाजाचे ध्येय काय व कसे असावे हे निबंधमालाकार सांगतात :–" सत्य हे एकाच राष्ट्राला, एकाच धर्माला किंवा एकाच पक्षाला अनुसरून असते असे नाही; तर अशोधित धातूत जसे सुवर्णरज यदृच्छेने मिसळले असतात, व रसायन व्यापारांनी त्यांचे पृथक्करण करून ते वेगळे काढावे लागतात, त्याचप्रमाणे सत्याचीही गोष्ट होय. यास्तव एकाच पक्षाचा दृढ अभिमान धरणे दुरभिमान होय." ह्याच न्याय खुद्द चिपळूणकर व फुले यांच्या लिखाणाला लागू केला पाहिजे. केवळ आपल्याला जी थोर व्यक्ती आवडते तिचा फक्त गौरव–स्तुती केली म्हणजे कार्यभाग आटोपला असे कोणी मानू नये. दोघांच्याही चाहत्यांनी आपआपला जन्मप्राप्त म्हणजे नैसर्गिक जात्यभिमान दूर ठेविला पाहिजे.

"चवाठ्यावर शेणमार खालेल्या ख्रिस्त पुत्रांनी" असा एक उल्लेख चिपळूणकरात मिळतो. त्यांच्या काळात रेव्ह. मरे मिचेल सारखे मिशनरी पुण्यात व इतरत्र ख्रिस्ती धर्मप्रचार करीत होते. त्यांना सडकून विरोध होई. तो त्यांनी सोसला ! विरोध करण्यात ब्राह्मण अग्रेसर होते. शूद्रातिशूद्रांतील

फुले, घोले, लाड, लोखंडे व लंकर, भालेकर यांची शिक्षणे मिशनरी शाळेत झाली. पहिले बहुतेक प्रांतोप्रांतीचे सुधारक देखील मिशनऱ्यांच्या शाळेतून शिकले. जोतीराव हे एकटेच अपवाद नव्हते. बाबा पदमणजी यांचे 'अरुणोदय' नामक आत्मचरित्र पाहता फुल्यांनी जी समाजस्थिती सोसली तीच पदमणजी यांनी सोसली. त्यांनी जोतीरावांप्रमाणे हिंदूच राहून समाजाची सेवा करायला हवी होती. शूद्रातिशूद्र समाजांना "ज्ञानोदय" व देशीविदेशी मिशनरी जवळचे वाटले! बाबा पदमनजी आणि ज्ञानोदयाने सामाजिक सुधारणेच्या बाजूने खूप परिश्रम घेतले. लोकहितवादी वगैरे सुधारक देखील ज्ञानोदयाचा आश्रय व सहकार्य घेत. त्यावेळच्या ब्राह्मणसमाजापुढे व चिपळूणकरांच्या पुढे फक्त "राजकीय पारतंत्र्य" एवढेच दुःख होते. उदा., "इंग्रजी राज्यापासून आमची पहिली मोठी हानी कोणती झाली म्हणाल तर स्वातंत्र्यनाश. स्वातंत्र्याची स्थिती पारतंत्र्यापेक्षा किती सुखावह असते हे कोणालाही सांगायला नकोच." (पृ. १६५) [आज पूर्ण स्वातंत्र्य येऊनही 'सुखावह' स्थितीत आपण आलो आहोत काय ? ]

"...... रेव्ह. मिचेल, टेलर वगैरे मण्डळी हिंदु धर्माच्या संबंधाने असंबद्ध प्रलाप करण्यात जो व्यर्थ कालक्षेप करते, तिच जर पवित्र शास्त्रातले एकेक वचन घेऊन त्याचे स्पष्टीकरण हिंदुस्थानच्या इतिहासातून करू लागेल तर केवढी मनोरंजक व्याख्याने होतील बरे!" (पृ. १७९) अशा प्रकारचे कार्य धर्मांतर न करिता हिंदुस्थानच्या इतिहासातून राममोहन-फुले वगैरे धर्मसुधारकांनी केले. स्वत: जोतीबांना रेव्ह. मरे मिचेल यांच्या जवळ बायबलचे उत्कृष्ट ज्ञान प्राप्त झाले. पवित्र शास्त्राला खुद्द विष्णुशास्त्री यांचा विरोध नव्हता. बायबलची ओळखही चिपळूणकरांनी करून दिली आहे. मिशनऱ्यांनी हिंदुधर्माची चालविलेली विटंबना त्यांना नको होती. ख्रिस्ती मिशनऱ्यांचे व ख्रिस्ती पाश्चात्त्य पंडितांचे आधार घेऊन मते माण्डणाऱ्या सुधारकांची पद्धत विष्णुशास्त्र्यांना अमान्य होती. सुधारकांनी पाश्चात्त्य पंडितांची संशोधनीय मते तपासून तावूनसुलाखून घेतली नाहीत व भारतीय समाज व धर्मेतिहास यांचा स्वभावही त्यांनी अभ्यासला नाही.

"आमच्या देशाची स्थिती" ह्या शेवटच्या निबंधात उपहासापेक्षा विवेक जास्तीच सापडतो. जोतीबांच्या शेवटच्या 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकात गुलामगिरीपेक्षा विवेक जास्ती आढळतो. चिपळूणकरांना अधिक आयुष्य म. फुले यांच्या इतके जरी लाभले असते तर त्यांच्यातही पुढे पक्वता आली असती. सार्वजनिक दुर्दैव येथेच आढळते. चिपळूणकर व फुले या दोघांचा विषयांतराकडे कल आढळतो. स्वमतांचा प्रचार पुनरुक्तीने देखील दोघांच्या टीकेत आहे.

मूलतः निबंधमाला ठराविक पक्षाची नव्हती. "अमुकअमुक पक्षाचे किंवा अमुकअमुक मताचे आम्ही अभिमानी आहो असा बाणा 'बाँबे ग्याझिट' किंवा 'ज्ञानोदय' यांच्या प्रमाणेच त्याने बाळगणे म्हणजे आपले कर्तव्य विसरून जाणे होय." (पृ. १५४) स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा हा चिपळूणकरांचा एक अभिमानी विचारपक्षच वाटतो.

इंग्रज लोकांचा 'स्तुतिपाठ' चिपळूणकरांना (व पुढील टिळकांना) आवडत नसे. फुले लोकहितवादी व रानडे वगैरे तत्सम सुधारकांत व चिपळूणकरांत अंतर व असहकार्य निर्माण झाले, हे एक कारण होते. "एक पारतंत्र्य म्हटले म्हणजे ते दर एक ठिकाणी नडत असते." पारतंत्र्याची गय करण्याची वृत्ती त्या काळात वाढली नव्हतीच, असे म्हणता येत नाही. पण आता नडणारे पारतंत्र्य गेल्यामुळे नेमस्तांचे व हिंदुधर्मसुधारकांचे विचार यापुढे सर्वथा मोडीत काढण्याची गरज नाही. उलट, उदार विचाराकडे वळले पाहिजे. या दृष्टीने वरील सर्व सुधारकांवर स्वातंत्र्यात निदान आता अभ्यास वाढतही आहे. "आपल्या देशाची स्थिती" हा विषय आता स्वातंत्र्यात वेगळ्या प्रकारे माण्डणे भाग आहे. कारण 'स्थिती' ही एकसारखी परिवर्तनीय असते, तिची उपपत्ती व उपचार बदलतात.

बहुदेवतावाद (मूर्तिपूजा), जातिभेद, बालविवाह, विधवाविवाह, स्त्रीशिक्षण वगैरे सुधारणा प्रथम झाल्या पाहिजेत असा हट्ट धरून हिंदुधर्मातीलच जोतीराव फुले यांच्यासारख्या कित्येक सुधारकांनी प्रयत्न चालविला होता. तो प्रयत्न व मिश्रविवाह (सवर्णीलंकार) वगैरे जातिभेद मोडण्यासाठी व हिंदुधर्मातील विघातक बाबी दूर करण्यासाठी देश-






भर चळवळ चालविली होती, तिची जरुरी स्वातंत्र्याइतकी चिपळूणकरांना मुळीच वाटली नाही. याच कारणामुळे दयानंदांवरही त्यांनी उपहासाचे शस्त्र चालविले. 'सबगोलंकार' चिपळूणकरांना अमान्य होता. पण आता स्वातंत्र्यात धर्मसुधारकांच्या मताकडे व त्यांच्या प्रबोधनाकडे देशाला सर्वथा पाठ फिरविता येणार नाही. भारतीय घटनेत वरील सुधारकांचे कित्येक विचार व पवित्रे प्रतिबिंबित झालेच आहेत. अस्पृश्यतानिवारण हा राष्ट्रीय व हिंदुधर्मसंरक्षणाच्या दृष्टीने अत्यंत प्रधान मुद्दा, याच्या केवळ शाब्दिक निषेधासही निबंधमाला प्रवृत्त झालेली दिसत नाही. ह्या राष्ट्रीय प्राणरक्षक मुद्द्याला जोतीबांनी सक्रीय हात घातला. राममोहन–रानडे–फुले वगैरे धर्मसुधारक निबंधमालेला जवळचे मुळीच वाटले नाहीत ! कालमहिमा असा की चिपळूणकर व टिळक यांना मानणारे बॅ. सावरकर हे क्रांतिकारक सुधारक झाले. सावरकरांनी फुल्यांना क्रांतिकारक म्हणून गौरविले. तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी परिषद–'धर्मनिर्णय मंडळ' ह्या विद्वानांच्या सभेने बहुतेक सर्व सामाजिक सुधारणांना शास्त्राधार दाखवून त्यांना मान्यता दिली. समाजधर्मसुधारक चिपळूणकरांच्या दृष्टिकोणातूनच हिंदुधर्माभिमानी, देशाभिमानी व राष्ट्राभिमानी नव्हते, असे प्रतिपादण्याची मूलतः गरज राहिली नाही. स्वातंत्र्य म्हणजे फक्त राजकीय स्वातंत्र्य ही व्याख्या पूर्ण व्याख्या नव्हे. राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यामुळे आता भारत सर्वतोपरी सुखी व समृद्ध झाला आहे, असे नव्हे.

जोतीबांनी 'आपल्या समाजाची स्थिती' जी त्यांच्या अनेक पुस्तकांत अनेकवार दिली आहे, तिच्यामध्येही पुष्कळ पालट झाला आहे. पेशवाईनंतरची अव्वल इंग्रजीतील शूद्रातिशूद्रांची अवस्था आज राहिली नाही. मालाकार व फुले केवढ्या प्रमाणात आताच्या काळाच्या दृष्टीने शंभर वर्षांनंतर प्रमाण धरावेत व प्रमाण धरू नयेत हे शोधून तपासले पाहिजे. आजचे प्रश्न भिन्न आहेत. आलेले स्वातंत्र्य टिकवून त्याचे सुराज्य कसे करावे ? हा मोठा प्रश्न आहे. याप्रमाणे दोघांचेही संदर्भ पालटले आहेत. परवशता हे दुःखाचे कारण आहे, असे सांगताना त्यांच्या काळात परवशता जाणे अशक्य आहे, याची जाणीव चिपळूणकरांनी प्रकट केली आहे. दोघांत उत्तर ध्रुव व दक्षिण ध्रुव एवढे प्रत्यक्ष व विचारांतही अंतर होते. दोघांना एकाच पंक्तीत स्वातंत्र्यातही बसविणे कठीण व अशक्य आहे. दोघांवरील संस्कार व दोघांची ऐहिक व बौद्धिक परिस्थिती भिन्न होती. 'आमच्या देशाची स्थिती' हा इंग्रजसरकार, मिशनरी व युरोपियन अधिकारी यांच्यावर घणाघात घालणारा अव्वल इंग्रजीत लिहिलेला गाजलेला व जप्त झालेला निबंध लिहून प्रसिद्ध करण्यात शास्त्रीबोवांचे राजकीय धैर्य प्रगट झाले. सर्वथा त्यांना भित्रे म्हणणे अप्रस्तुत ठरते. त्याचप्रमाणे पुण्यात सनातनी कट्टर केंद्रात स. शो. समाज स्थापण्यातही जोतीबांचे अपूर्व धैर्य दिसले. इंग्रज–गोरे अधिकारी यांच्यावर जोतीबांनी घणाघात घातले आहेत हे वाचल्यास ते राजकीय दृष्टचा भित्रे होते हेही आज म्हणणे अयोग्य होय. प्रिन्स ऑफ वेल्स, व्हिक्टोरिया राणी वगैरेंना त्यांनी ठणकावून कित्येक शेतकऱ्यांची दुःखे निर्भयपणे मांडली होती. दोघांचे ध्येय व कार्य (Life Mission) भिन्न होते. तरी त्यांच्या त्यांच्या संदर्भाने दोघांतील कित्येक साम्ये शोधता येतात. फुले व मालाकार ही दोन टोके आहेत. हा विषय तसा विजोड आहे. परस्परविरोधी आहे.

## फुले व मालाकार यांच्यांतील अद्वैत व द्वैत

पण साम्ये पाहू लागल्यास वैषम्येच जास्ती दिसू लागतात. उदा., इंग्रजी भाषेचे आक्रमण थोपवून धरून मराठी भाषेची वृद्धी करण्यासाठी निबंधमाला निघाली. महात्मा फुले यांच्या लिहिण्याचा उद्देश शूद्रातिशूद्रांना जागे करून त्यांना पुढे आणण्याचा होता. 'हितकर आणि मनोहरही' लिहिण्याचा उद्देश चिपळूणकरांचा होता. पण फुले व चिपळूणकर दोघेही प्रतिपक्षावर तुटून पडले. 'सत्यनिरूपण' हाच दोघांचा उद्देश होता. 'मनोहर' लिहिण्यापेक्षा खंडणाचा उद्योग चिपळूणकरांनी केला. खण्डणाच्या पसाऱ्यात मण्डण दोघांतही लुप्त झालेले वाटते. विद्वत्ता, पांडित्य व पदवी जोतीरावांजवळ नव्हती. तरी दोघांनीही मागील इतिहासात जाऊन लिहिले आहे: "Error is but an opinion in the making." मिल्टनची ही दृष्टी जोतीरावांच्या लिखाणास लावल्यास

अनुक्रमणिका

चुकीचा वाटणारा त्यांचा इतिहासप्रपंच काही काही वेळा सत्याकडे नेण्यास कारणीभूत व प्रेरक होतो. दोघांनीही सत्याचा महिमा सांगितला आहे. शूद्रातिशूद्रांची कैफियत–बाजू–जोतीरावांनी माण्डताना ब्राह्मण–भट समाजावर व विशेषतः चित्तपावनांवर जी घणाघाती व जहरी टीका केली तिचा परिहार करण्याचे मालेच्या नशिबी आले, परंतु पेशवाईत जे पेशवे पतित–दुसऱ्या बाजीरावासारखे–त्यांच्यावर दोघांनीही टीकास्त्र धरले आहे. निर्भत्सना दोघांतही विपुल सापडते. वाचनाचा व लेखनाचा व्यासंग दोघांचाही होता. भाषांतरित साहित्य ह्या मालापूर्व काळातील वाङ्मयप्रकार या दोघांनीही टाळला आहे. जे मनापासून वाटते व सलते हे अनुभवाने पाहून दोघांनीही लिहिले आहे. 'लोकभ्रम' ह्या विषयावर विचार माण्डताना रामदास व तुकाराम यांचे आधार घेऊन भोळ्या भावाचे खण्डण केले आहे. संतांचे आधार ह्या कार्यासाठी प्रार्थनासमाजी पुढाऱ्यांनीही घेण्याची पद्धत पुढे मागे वाढविली. शूद्र व घोंगड्या कवी म्हणून तुकारामाची मालाकारांनी निर्भत्सना केली होती, ती दुर्दैवी होय !

## लोकभ्रमावर विचार

प्रपंच करीत असताना मालाकार देखील कडवे सुधारक वाटतात. जोतीबा तर हाडाचे सुधारक होते. फलज्योतिष दोघांनाही आवडत नव्हते. दोघांविषयी समबुद्धी बाळगून लिहिणारांना व पाहणारांना मालाकार व फुले यांच्यात काही अशी थोडीच साम्ये आढळू शकतील. उदा., दोघेही आस्तिक होते. अवाढव्य आकाश ( पोकळी ) व ईश्वराच्या अनंतत्वाची जाणीव दोघांत आढळते. लोकभ्रम निबंधाच्या शेवटच्या परिच्छेदात चिपळूणकरांचा "एकेश्वरवाद" आढळतो. तोच जोतीरावांचा पायाभूत विचार होता. निबंधमालेत वर्षाअखेर जे आत्मनिवेदन चिपळूणकरांनी केले आहे त्यात इष्ट देवतेची प्रार्थना नाही; तर एका सार्वजनिक व सर्वव्यापी परमेश्वराचे स्मरण व प्रार्थना आढळते. संतांचे उद्गार आधाराला घेऊन निबंधमालेने लोकभ्रम–अंधश्रद्धा निर्दाळली आहे. पण समाजसुधारकांत ते गणिले जात नाहीत. जोतीरावांनी गरीब शूद्रातिशूद्रांचा पक्ष घेतला, त्याउलट निबंधमालेने ब्राह्मणांचा पक्ष घेतला.

प्रार्थनासमाजावर निबंधमालेत जी टीका आढळते, ती एकेश्वरवादाच्या मूलतत्त्वविरोधी नाही, उपासना-पद्धतीवर त्यांचा रोख होता. पण उत्तरोत्तर अनुकरण व ख्रिस्ती सहवास यांची जरुरी नव्या समाजातही राहिली नाही. प्रार्थनासमाजाला (व सत्यशोधक समाजालाही) भवितव्य प्राप्त व्हावयाचे झाल्यास चिपळूणकरांची टीका लक्षात घ्यावयास पाहिजे. हे सर्व नवसमाज (आर्यसमाजासह) महाराष्ट्रात चिपळूणकरांच्या वेळी पुढे आले तरी निबंधमालेच्या हयातीतच त्यांना उतरती कळा लागली, भरपूर पाठिंबा मिळाला नाही असे विष्णुशास्त्री यांनीच म्हटले आहे. आज ह्या समाजांचे कार्य महाराष्ट्रात दिसत नाही. मात्र सैद्धांतिक व तत्त्वभूत अशी टीका चिपळूणकरांनी कोणत्याही नवसमाजावर केली नाही. म्हणून निबंधमालेचे प्रतिक्रियावादी पांडित्य उथळ ठरले.

लोकहितवादींवर टीका करिताना शेवटी देखील जोतीराव चिपळूणकरांच्या नजरेपुढे येतात. शतपत्रांतील व गुलामगिरीतील कित्येक मुद्दे एकसारखे असल्यामुळे जोतीराव व लोकहितवादी यांच्यावर झालेल्या टीकेचे स्वरूप कित्येक ठिकाणी एकसारखे दिसते. कारण जोतीबात पुढे शतपत्रांचे पडसाद दिसतात, व गुलामगिरीतील कित्येक मुद्द्यांवर अधिक खण्डण शतपत्रांत होते. दीनबंधूच्या टीकेस ज्या धर्तीचे उत्तर दिले त्याच धर्तीचे उत्तर लोकहितवादींवर चिपळूणकरांनी केलेल्या टीकेवर जी इतरांकडून प्रतिक्रिया झालेली चिपळूणकरांना आढळली तिची धर्ती म्हणजे काही मुद्दे तरी एकसारखे वाटतील. 'राममोहन ते फुले' असा एक कालखण्ड खुद्द चिपळूणकरांनी मानिला आहे. (पृ. १०६५). चिपळूणकरात परकीयांचे अनुकरण मुळीच नाही असे नव्हे. त्यांचे गद्य इंग्रजी धर्तीचे आहे. स्वतः ते पदवीधर-इंग्रजी शिकलेले– होते इंग्रजी विद्येला वाघीणीचे दूध म्हणून त्यांनी म्हटले. त्यांनी स्वावलंबनाने न्यू इंग्लिश स्कूलही काढले. जोतीरावांचा सर्व आटापिटा जनतेच्या निरक्षरता निवारणासाठी, प्राथमिक शिक्षण सक्तीचे व्हावे, यासाठी होता. अव्वल इंग्रजीत शिक्षणाची द्वारे

शूद्रातिशूद्रांना प्रथम खुली झाली. म्हणून हा काळ उठाउठी करून त्यांना पुढे येण्यास योग्य आहे, असे त्यांना अनुभवाने वाटले. दोघांनीही इंग्रजी सत्तेपासून झालेले फायदे दिले आहेत. चिपळूणकरांनी इंग्रजी सत्तेपासून झालेले तोटे, मिशनऱ्यांच्या धर्मप्रसारापासून होणारी हानी, सुधारकांची उत्कट अनुकरण करण्याची पाश्चात्य वृत्ती, ह्यांवर प्रहार केले आहेत. जोतीबांनी चिपळूणकरांची ही सर्व दृष्टी व्यक्त केली नाही. 'मालाकार व फुले' हा विषय घेण्याचे कारण चिपळूणकरांच्या जोतीरावांवरील टीकेची इष्टा निष्टता पाहाणे, हे होते. यामुळेच हा विषय हातात घेणे भाग होते. नाहीतर दोघे एकमेकांच्या विरुद्ध विचारांचे ठरतात. देशाच्या दुर्दशेची कारणे, दोघे एकमेकाविरुद्ध देतात. सामाजिक मूलभूत सुधारणाची गरज उत्कटतेने चिपळूणकरांना भासलीच नाही. मल्हारी धनगराचे जेव्हा मल्हारराव बनले तेव्हा जोतिबांची गुलामगिरी कोठे गेली होती बरे? (पृ. २१४, आमच्या देशाची स्थिती) असा गुलामगिरीतील विवेचनाविरुद्ध विचार चिपळूणकर माण्डतात! आपआपल्या परीने दोघेही 'एकांगी' असलेले एकमेक विचारात एकमेकांचे शत्रू ठरतात. म्हणून दोघांच्या पश्चातही दोघांच्या विचारांचा संग्राम झाला. दोघांच्या विचारांत साम्य व अद्वैत अभावाने आढळते, हेच शेवटी खरे. चिपळूणकरांनी जो असंतोष व्यक्त केला तो राजकीय होता व फूल्यांचा असंतोष सामाजिक व धार्मिक होता. डॉ. आंबेडकर यांना याच कारणामुळे चिपळूणकरांबद्दल व पुढील टिळकांबद्दलही सहानभूती वाटली नाही. फुल्यांना सामाजिक-धार्मिक स्वातंत्र्याचे सक्रीय पुरस्कर्ते म्हणून आंबेडकरांनी जवळ धरिले व गुरू केले. जहाल व राष्ट्रीय पुढाऱ्यांत आणि फुले-आंबेडकरांत विलक्षण फरक पडला.

## काही सारासार विचार

वासुदेव बळवंत फडक्यांशी पूर्व वयात मैत्री असतानाही उत्तर आयुष्यात फुले यांनी फाशी गेलेल्या वासुदेव बळवंतांविरुद्ध लिहिले! चिपळूणकरांना मुळातच क्रांतिकारकांचा मार्ग मान्य नव्हता. इंग्रजांशी चिपळूणकर लेखणीने लढले. इंग्रजी राज्य हे 'वरदान' विष्णुशास्त्री यांनी सुधारकांच्या प्रमाणे कधीच मानिले नाही. हे 'वरदान' नष्ट कसे होईल याचीच चिंता त्यांना सामाजिक सुधारणांपेक्षा जास्ती होती. म्हणूनही विलक्षण अंतर पडले, इंग्रजी राज्याशी राजनिष्ठ राहून ब्राह्मणेतरांची प्रगती साधेल, त्यांना समान हक्क, समान संधी मिळेल, असा विश्वास जोतीबांच्या पक्षाचा होता. पुनः पेशवाई यऊ नये याची काळजी जोतीराव व शाहूंना मनस्वी होती. ज्या कारणांमुळे चिपळूणकर व फुले यांच्यात अंतर पडले त्याच भिन्न दृष्टिकोणामुळे शाहू व टिळक यांच्यात संघर्ष झाला. म. गांधी यांनी समाजसुधारणा व राजकीय सुधारणा हे दोन प्रवाह एक मानून त्यांच्या अगोदर पृथक राहाणारे प्रवाह एक केले नसते तर वरील अंतर तसे पुढे आणखी कित्येक वर्षे रेंगाळत राहिले असते! हल्ली चिपळूणकर-टिळक यांचा प्रवाह व फुले-शाहू यांचा प्रवाह यांमधील दरी पुष्कळच भरून आली आहे. तौलनिक व समन्वयात्मक अभ्यास वाढला पाहिजे.

अव्वल इंग्रजीतील पहिल्या सुशिक्षितांना भारत इंग्रजाधीन का झाला? याची कारणे शोधण्याची गरज भासली. जातिभेदामुळे हिंदी समाज विघटित झाला; व होतो. म्हणून जातिभेदनिवारण व इतर अनेक सामाजिक सुधारणांचा त्यांनी पुरस्कार केला. परंतु चिपळूणकरांना हिंदुधर्मात सुधारणा व परिवर्तन करण्याची निकड वाटली नाही. आत्मपरीक्षणपूर्वक ज्यांनी ही कामे हातात घेतली, त्यांना त्यांनी ख्रिस्ताळलेले समजून विरोधच केला. पण 'देशोन्नती' ह्या केसरीतील निबंधात त्यांनी जातिभेदापासून होणारा तोटा सांगितला आहे. "याने (जातिभेदाने) तर या राष्ट्राची फूट अतिशयितच पाडली आहे. अठरा पगड जातीस अठरा टोपकरांनी गुंडाळून टाकले व साऱ्यांच्या हाती सारखीच करवंटी दिली. पण लोकांचे डोळे अजून उघडत नाहीत." मूळ सत्यशोधक समाज यासाठीच निघाला. पण 'जातिभेद मोडणे' हा त्याचा उद्देश साध्य झाला नाही.

राष्ट्र म्हणजे फक्त भूप्रदेश नव्हे. राष्ट्रात राहणाऱ्या लोकांत परस्पर हितसंबंध व धार्मिक सामाजिक एकत्व, समता असावी लागते. म्हणजे सर्व थरांत देशाभिमान निर्माण होऊ शकतो, असा विवेक चिपळूणकरात नाही. देशाच्या भूतकालीन

अनुक्रमणिका

हिंदुपरंपरेचा सनातनी अभिमान म्हणजेच केवळ देशाभिमान असा त्यांचा कल दिसतो.

ज्या सामाजिक सुधारणांना त्यांनी विरोध केला त्या संबंधीचे कायदे झाले व ते स्वातंत्र्यातही पालटले गेले नाहीत. घटनेने समाजसुधारकांनी निर्माण केलेले अनेक मुद्दे सामावून घेतले आहेत. स्वातंत्र्यपूर्वकाळात होऊन गेलेल्या प्रबोधनाची छाप भारतीय घटनेवर आहेच. इंग्रजांपूर्वी येथे देशी राज्ये व स्वराज्ये होती तरी शूद्रातिशूद्रांची–कष्टकऱ्यांची –अवस्था जशी होती तशीच राहिली, इंग्रजीतही ती कायम आहे असा ऐतिहासिक अनुभव फुल्यांनी जाणिला व पोकळ देशाभिमानापेक्षा 'वर्गविग्रह' त्यांनी महत्त्वाचा गणिला. फुले व चिपळूणकर यांच्यात जमले नाही, याचे आश्चर्य मानण्याचे मुळीच कारण नाही. उभयतांत द्वैत का उभे राहिले, हेच तपासावे लागते. शूद्रातिशूद्र म्हणजे फार मोठा बहुलोक समाज जोतीबांच्या डोळ्यापुढे होता. शूद्रातिशूद्रांची बाजू घेणे म्हणजे म्हणजे कोणाएका जातीची बाजू जोतीबांनी घेतली नाही. देशाभिमानाच्या नावावर शूद्रातिशूद्र, बहुलोकसमाज मागे राहणे जोतीबांना पसंत नव्हते.

हिंदुधर्मात व मनुस्मृतीसारख्या ग्रंथात विषमता आहे, हे जोतीबांनी जाणले. त्याचप्रमाणे बायबलही पूर्ण व निर्दोष नाही, हेही जाणले. कोणताही ग्रंथ ईश्वरप्रणीत व सर्वांशी प्रमाण नाही ह्या बुद्धिप्रामाण्यवादाला जोतीबांनी महत्त्व दिले. स्त्रीशूद्रातिशूद्रांच्या बाबतीत पूर्व धर्मग्रंथांनी पक्षपात केला, अशी संतांचीही अगोदर तक्रार होती. जोतीबांनी पक्षपाती धर्मग्रंथांविरुद्ध उठाव करून बंड उभारले. राममोहन राय यांचा दृष्टिकोण व जोतीबांचे विचार ह्यांत साम्य आढळते. हा मानवतावाद महत्त्वाचा आहे. मानवतावादापुढे सारेच ऐतिहासिक धर्म त्यांना थिटे वाटले व सत्य हाच धर्म ही त्यांची अंतिम वृत्ती झाली. राममोहनपासूनच्या धर्म व समाजसुधारकांनी व जोतीबांनी जातिभेद-अस्पृश्यतानिवारण त्याज्य ठरविले. आजही विश्वहिंदुधर्म व आर्. एस्. एस्. ह्या हिंदुधर्मातील विषम बाजू म्हणून त्याविरुद्ध लढण्यास उद्युक्त झाले आहेत. धर्म व समाजसुधारक झाले नसते तर फार मोठ्या प्रमाणात धर्मांतरे घडली असती; हा धोका चिपळूणकरांना ज्ञात नव्हता. दयानंद तर फार पूर्वीच होणे जरूर होते.

**"I will not spare Jotiba" –विष्णुशास्त्री**

"Indeed in my own estimation, a Rao Bahadoor Knocked down successfully, is in an infinetly more creditable game than all Dayanands and Jotiba put together? If my tone is more respectful towards the Rao Bahadoor (Ranade) than towards the great auther of गुलामगिरी that is due to unspeakable difference between the first man of the age and Soviest Scriber with just clothing of humanity on him."
('चित्रमयजगत्', मे १९३२)

दयानंद तर मिशनऱ्यांच्या विरुद्ध होते; व त्यांचे आक्रमण दूर सारावे, ह्या हेतूसाठी त्यांनी आर्यसमाज स्थापला होता. पण त्यांचा मूर्तिपूजा व वर्ण–जातिभेद आणि ब्राह्मण्यविरोधी पवित्रा परंपरावादी चिपळूणकरांना मुळीच आवडला नाही. चिपळूणकर व त्यांची परंपरा व ब्राह्मणेतरांतीलच जोतीबांचे आप्तेष्ट आणि तत्सम परंपरावादी यांचा मिशनरींशी जोतीबांचा जो संबंध कर्मधर्मसंयोगाने व नव्या अव्वल इंग्रजीतील काळानुसार आला, त्यामुळे जोतीबांपासून तेही दुरावले होते. १८५७ च्या उठावात जोतीबांचा संशय येऊन युरोपियन पाद्री वगैरे त्यांना 'हिडीस फिडीस करू लागले' या कारणामुळे जोतीबांचा वरील 'अवतार' समाप्त झाला व स्वतः जोतीबादेखील मिशनऱ्यांपासून उत्तरोत्तर जास्तीजास्तीपणे दुरावले; व सत्यशोधक समाजाच्या स्वतंत्र स्थापनेचे म्हणजे (हिंदुधर्मसुधारणेचे) नवे कार्य जोतीबांनी हातात घेतले आणि आमरण केले. जोतीबांचे उत्तर चरित्र व कार्य चिपळूणकरांच्या पश्चात झाले. हे जोतीबांचे परिवर्तनशील चरित्र विष्णूशास्त्री यांनीच दिले आहे. बर्वे–केसमध्ये केसरीचे टिळक-आगरकर यांना जोतीबांनी जामीन मिळवून दिला, हा खटला चालू असता मालाकार अकल्पित वारले!

'सत्यदीपिका' व 'ज्ञानोदय' या पत्रांनी चिपळूणकरांवर 'राज्यद्रोहाचा' आरोप मागेच करण्यास सुरुवात केली होती. निबंधमालेच्या

पहिल्या वर्षापासूनच चिपळूणकर या ख्रिस्ती पत्राविरुद्ध अर्थात होते. " इंग्रजीविद्येचा फैलाव होऊन नव्या ज्ञानाचा व कल्पनांचा चोहोंकडे प्रसार होत गेल्याने व ख्रिस्ती धर्माच्या निरनिराळ्या शाखा, ब्रह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज, सत्याला शोधणारी मंडळी......अशा शेंकडो नव्या नव्या पंथांनी लोकांच्या मनाचे शतशः विदारण होऊन इसापनीतीतील शंभर युक्तीवाल्या कोल्ह्याप्रमाणे त्यांची अवस्था होत गेली आहे. " ( पृ. २९२ ) वरील सर्व प्रयत्न चिपळूणकरांच्या देशाभिमानाच्या = धर्माभिमानाच्या व्याख्येत मुळीच बसत नव्हते. या सर्वांवर व त्यांच्या त्यांच्या थोर थोर संस्थापकांवर चिपळूणकरांनी एकसारखे लेखणीचे हत्यार चालविले. वक्तृत्व हा अगर अन्य कोणताही दूरचा विषय असो, चिपळूणकरांना जोतीराव सर्वत्र उल्लेखनीय व उपहासास पात्र वाटतात. नवीन पुस्तके– ' अपभ्रष्टचंद्रिका ' यावर अभिप्राय देतानाही चिपळूणकर गुलामगिरी पुस्तककर्त्यावर न विसरता, न चुकता विषयांतर करूनही घसरले. ( पृ. ४९२ ). चिपळूणकरांचा स्वभाव व त्यांच्या मतांचा थांगपत्ता लागतो व त्यांनी " I will not spare Jotiba " हे दीर्घ व्रत चालविलेले आढळते. यासंबंधीचे बहुतेक तत्सम उल्लेख आम्ही वाचकांपुढे ठेवून चिपळूणकरांनी जोतीबांना Spare केले नाही, याच्या सार्वजनिक कारणांची ह्या लेखात मीमांसा केली आहे. निबंधमालेत आणखी शोधणारांना यासंबंधाने एखाद दुसरा नव्हे, अनेकही चिपळूणकरांनी जोतीबासंबंधीचे केलेले विरोधी उल्लेख सापडतील. पण एवढे पुष्कळ झाले. वाईचे ' धर्म ' मासिकाचे संपादक कै. भाऊशास्त्री हे चिपळूणकरी संप्रदायाचेच झाले.

प्रथमपासून निबंधमालेच्याद्वारे तो अखेरपर्यंत विष्णुशास्त्री यांनी फुले यांच्यावर सतत आघात केले; व जोतीरावांनी ते सोसले. लोकहितवादी –फुले यांनी ब्राह्मण, हिंदुधर्म व त्याचे ग्रंथ वगैरेंवर जो हल्ला केला, त्याला निबंधमालेएवढे दुसऱ्या कोणीच तोण्ड दिले नाही. ही सर्व प्रतिक्रिया असली तरी ती सर्वथा व सर्वांशी अप्रमाण नव्हती. त्याचप्रमाणे सत्यशोधक फुले यांचा ब्राह्मणावरील लेखी सर्व हल्ला सर्वथा खरा–निर्बाधित–ठरविणे दुष्कर होय. मात्र फक्त पारतंत्र्य गेले म्हणूनच शूद्रातिशूद्रांची जी दुःखे मागे होती ती सर्वथा संपली, असेही नव्हे. शेतकऱ्यांचे प्रश्न आहेतच.

## वाङ्मयसेवक मालाकार व फुले

थोरामोठ्यांवर केलेली टीका, विसंगती, परस्परविरोध वगैरे आक्षेप जे निबंधमालेवर आले त्यांचेही मण्डण ' चिपळूणकरांनी ' केले. ते आजही वाचनीय आहे. प्रतिवर्षी त्यांनी केलेली आत्मनिवेदने त्यांचा स्वभाव दर्शवितात; व त्यांच्या चरित्रावर प्रकाश टाकण्यास साह्य करितात.

खुद्द वडील कृष्णशास्त्री व घरातील इतर वडिलधारी माणसे यांना विष्णुशास्त्री यांनी निबंधमालेतून चालविलेली उपहासप्रधान टीका नापसंत होती व हा सर्व मार्ग त्यांनी सोडून द्यावा असेही त्यांना सांगण्यात येई; पण त्यांनी कोणाचेही ऐकिले नाही ! फुल्यांचीही जावजी दादाजी वगैरेंसारखी सूज्ञ मंडळी ब्राह्मणविरोधाच्या कडकपणाबद्दल कानउघाडणी करीत ! चिपळूणकर व फुले जोतीराव दोघेही आपआपल्यापरी हट्टीच होते.

लोकहितवादी–फुले आदिकरून सर्व सुधारकांवर पाश्चात्यांच्या अनुकरणाचा आरोप निबंधमालाकर्त्यांनी केला. पण ह्या आक्षेपात स्वतः ते सुटले नाहीत " He was greatly influenced by Johnson and Macaulay and unconsciously formed his style on their model. " मालापूर्व मराठी वाङ्मयात इंग्रजी लेखकांचे अनुकरण केलेले नाही, अशी पुस्तके आहेत. जोतीरावांची मराठी तशी स्वतः त्यांचीच होती. पल्लेदार वाक्ये, संवाद, शाहिरी व अभंगात्मक अखंड काव्ये त्यांच्यात आहेत. आता दोघेही वाङ्मयसेवक गणिले जातात. इंग्रजी विद्या घेतलेले नवे सुशिक्षित मराठीची उपेक्षा करितात ती घालवावी असा हेतु निबंधमालेच्या पहिल्या अंकात प्रगट झाला आहे. इंग्रज सरकार –मिशनरी, देशी धर्म व समाजसुधारक यांचाच प्रतिकार व विरोध करण्यात मालेची जास्तीतजास्त शक्ती खर्ची पडली. तात्त्विक, भारदस्त व प्रसन्न मण्डणास दोघांनाही अवसर मिळाला नाही. ही उणीव रानडे-भांडारकर यांनी प्रसन्न शैलीने भरून काढली.

### चिपळूणकर व विवेकानंद

अव्वल इंग्रजीत इंग्रजांचा धर्म, भाषा व संस्कृती यांची भलभलावणी करण्याकडे नवसुशिक्षितांचा कल वाढला होता. तो सावरावा असा चिपळूणकरांचा हेतू होता. बंगालमधील सुशिक्षित लोक, ब्राह्मोसमाजी केशव चंद्रासारखे धर्मसुधारक ख्रिस्ती धर्माकडे कललेले होते. याविरुद्ध वेदाभिमानी विवेकानंदांनी आवाज उठविला. पण त्यांनी तत्त्वविवेचन केले; व हिंदुधर्माची थोरवी साधार सांगितली. पण पाश्चात्त्यांचे सर्वच वाईट असे एका टोकास पुनः जाऊन प्रतिपादिले नाही. वैयक्तिक कोणाचा उपहास केला नाही. विवेकानंदांनी शूद्रातिशूद्रांची (गरिबांची) बाजू घेतली. वेदान्त धर्माची नवी माण्डणी केली. भारतीय धर्माचे उच्च स्वरूप प्रगट केले. पाश्चात्य देशांत जाऊन इंग्रजीतही व्याख्याने दिली. म्हणून त्यांचा परिणाम सर्व जगावर झाला; व चिपळूणकरांच्या पुढे जी त्रिसूत्री होती ती त्यांच्या दृष्टीतून बरीच प्रतिपादित झाली; काळाच्या मर्यादा सर्वांनाच पडल्या; व पडतात. विवेकानंदांनी राममोहन व दयानंद यांचा मूर्तिपूजाविरोधी पवित्रा स्वीकारला नाही. चिपळूणकर व फुले यांचा आवाज महाराष्ट्राबाहेर गेला नाही.

विवेकानंदानी पुरोहितशाहीवर जोतीबापेक्षा कडाडून हल्ला केलेला आढळतो. पण ब्राह्मणांनी भारतीय इतिहासात जी कामगिरी केली व वेद जतन केले वगैरे त्यांच्या कार्याची प्रशंसा केली आहे.

प्रस्तुत लेखक हा म. फुले यांच्या प्रवाहातील होय. तरी चिपळूणकरांच्या दृष्टीतून त्यांना फुले कसे दिसले ह्या संबंधीची चिकित्सा शक्य तेवढ्या तटस्थपणे केली आहे. जोशी व जोतीबा यांची कोणाशी मैत्री होती हे चिपळूणकरांनी सांगितले आहे. (पृ. ८८)

### साम्य व भेद

जोतीबांचा बायबलचा अभ्यास दाण्डगा होता तरी त्यांनी स्वतः रे. मरे मिचेल यांचा कोठेच उल्लेख केला नाही. किंवा त्यांचे आभार व ऋण व्यक्त केले नाही. ही ख्रिस्ती देशी व विदेशी मंडळी धर्मप्रचार करिताना हिन्दुधर्मावर–पुराणांवर लेखी व तोण्डी नावे ठेवीत असत व ख्रिस्ती धर्म कसा अधिक चांगला हे प्रचारीत असत. चिपळूणकरांच्या वेळेस मुस्लिम आक्रमणाचा प्रश्न नव्हता. आक्रमण होते ते मिशनऱ्यांचे. चिपळूणकरांनी येशू ख्रिस्ताची थोरवी व त्याची शिकवण सांगून इंग्रज राज्यकर्त्यांचे वर्तन येशूच्या शिकवणूकीच्या विरुद्ध कसे होते हे सांगितले आहे. येशू व ख्रिस्ती धर्म यांची माहिती चिपळूणकरांना होती आणि खुद्द ख्रिस्ती धर्माचा तात्त्विक उपहास करण्याचा त्यांचा इरादा नव्हता. 'आमच्या देशाची स्थिती' अंक ७९ वाचनीय आहे.

जोतीबांचे अनेक पुतळे झाले आहेत, व चिपळूणकरांच्या काळाप्रमाणे आता ज्ञानाच्या किल्ल्या ब्राह्मण समाजापाशीच आहेत, असे नव्हे. मराठी नागरी वृत्तपत्रसृष्टीने वैयक्तिक उपहासाची पद्धत अनुसरून ती वाढविली. फुल्यांच्या काळात दशावतारकल्पना व कथा लोकांत प्रिय होती. त्यावर ब्राह्मण-अब्राह्मणांच्या संबंधाच्या कल्पनांचे जोतीरावांनी कलम केले. जोतीरावांचा उद्देश इतिहाससंशोधन किंवा साहित्यसंपदा हाच नव्हता. शूद्रातिशूद्र बौद्धिक व मानसिक बाबतीत युगानुयुगे झोपले होते. फुल्यांनी नौबती-ढोल वाजवून घोर निद्रेत असलेल्यांना जागे करून विद्याप्रवण केले. अर्थात त्यांची सरस्वती व सारस्वत प्राज्ञ व संस्कृतज्ञ चिपळूणकरांनी त्रिसूत्रीची सतत उजळणी केली. आर्य बाहेरून आले हे सर्व विद्वान कबूल करितात. मूर्तिपूजा, जातिभेद, अस्पृश्यता वगैरे तत्सम विषमता येथील आर्येतर जनतेत मुळात होत्या. आर्य अल्पसंख्य असल्यामुळे बहुसंख्याकांमध्ये विरून जाताना वरील स्थानिक जुन्या परंपरा व रूढी स्वीकारल्या. ह्या पूर्वापार चालत आलेल्या विषम रूढींना स्मृति वगैरेत ग्रंथबद्ध करून त्यांचे कायदे झाले. हे ग्रंथ ईश्वरप्रणीत, निर्बाधित आहेत असे धर्मशास्त्राद्वारे ठरविले व इतर निरक्षर समाजांनी मानिले व विषम रूढींना धर्मशास्त्र, श्रुतिस्मृतींचा शास्त्राधार जोडला. ह्या ग्रंथातील विषम भागावर जोतीबांनी हल्ला केला. त्यांच्यापेक्षा त्यांनी भविष्य केल्याप्रमाणे महाशूद्र डॉ. आंबेडकर हे महाविद्वान शिष्य त्यांना भेटले; व विद्वत्ता आणि पांडित्य ह्या जोरावर त्यांनी जोतीरावांची बाजू सावरली. आंबेडकरांची भाषा–व्याकरण–व्युत्पत्त्या वगैरेवर पंडितांना व

शास्त्र्यांना जोतीरावांवर हल्ला करण्यास जो वाव मिळाला तो मिळू शकला नाही. फुले–आंबेडकर खेड्यांतीलही जनतेपर्यंत जाऊन पोहोचले. एवढा व्यापक परीघ व जनतासंपर्क चिपळूणकरांना अर्थात नाही. भूतकाळाचा वृथा अभिमान फुले–आंबेडकरांनी धरिला नाही.

भारतीय संस्कृती, साहित्य व इतिहास म्हणजे फक्त वैदिक व पुढील हिंदुधर्म नव्हे. जैन व बुद्ध यांच्यात आणखी मुस्लिम व ख्रिस्ती बांधव या व इतर सर्वांचा मिळून आधुनिक स्वतंत्र भारत झाला आहे. या सर्वांना सामावून घेणारा 'राष्ट्रधर्म' तयार करण्याचा प्रारंभ राममोहन व फुले यांच्यात दिसला. सामाजिक विषमता बाजूस सारून एक राष्ट्र नव्याने बनविण्याचे नवे राष्ट्रीय कार्य भारतापुढे उभे आहे. जोतीरावांप्रमाणे अस्पृश्योद्धाराच्या ह्या नवकार्याची मालाकार यांना जरुरी वाटली नाही. फक्त 'आधी राजकीय स्वातंत्र्य' या चळवळीस महाराष्ट्रात त्यांनी जन्म दिला. ख्रिस्ती धर्मप्रसारकांना विरोध केला, पण शुद्धीसारख्या चळवळीला जन्म दिला नाही. विष्णुशास्त्री यांच्यातील काळानुरूप भाग जेवढा सर्व समाजाला उपयोगी व हितप्रद होईल तेवढाच स्वीकारण्याशिवाय गती नाही. आत्यंतिक इंग्रजनिष्ठा ही म. गांधी यांच्या स्वराज्य लढ्यात जोतीरावांच्या शिष्यांना सोडावी लागली व ते अनेक बहुतेक पुढारी स्वातंत्र्ययुद्धात भाग घेते झाले. फुल्यांचे सर्वप्रामाण्य न मानिता काळानुरूप पुढे परिवर्तने नव्या नव्या विचारांच्या साह्याने करावी लागतील. ह्यासाठी फुल्यांचीही विचारतपासणी झाली पाहिजे. अशी तपासणी करण्याची प्रथम सुरुवात चिपळूणकरांनी केली. ती सर्वथा बिनचूक आहे, असे जबाबदार विचारवंत मानीत नाहीत. 'फुले-चिपळूणकरांनी नियतकालिके काढणे, शाळा काढणे वगैरे जे लोकोवृत्तीचे उद्योग व उपक्रम केले त्यासंबंधी त्यांच्यांत मतभेद नव्हता, व आता आपणात असण्याचे कारण नाही. फक्त दोघांच्या विचारासंबंधी मतभेद शक्य होतील. पुढे निघालेली डे. ए. सोसायटी (पुणे) ही देखील एकपरी चिपळूणकरांच्या प्रयत्नांचे फलित होय. न्यू इंग्लिश स्कूल, केसरी–मराठा वगैरे उपक्रम चिपळूणकरांनी चालू केले. ते पुढे चालविण्यास आगरकर, नंतर केळकर टिळक– इ. अनेक पात्र व समर्थ पुरुष त्यांना प्राप्त झाले. जोतीबांनी 'दीनबंधु', बालकगृह, अतिशूद्रांची शाळा, 'सत्सार' मासिक वगैरे अनेक उपक्रम चालू केले; पण विद्वानांची वरीलसारखी त्यागी परंपरा फुल्यांना भेटली नाही. फुल्यांनी स्थापिलेली व हल्ली चाललेली एकही प्रत्यक्ष त्यांची खुद्द संस्था सांगिता येत नाही. फुल्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष परिणाम पुढील सत्यशोधक–ब्राह्मणेतर चळवळींवर झालेला दिसतो. पण त्याचे स्वरूप जास्ती करून जातिवादावर अधिष्ठित होत गेले. चिपळूणकरांच्या प्रयत्नाने शहरात शिक्षणप्रसार वाढला. शिक्षण व त्याचा प्रसार हा जो स. शो. समाजाचा विधायक व रचनात्मक उद्देश होता, त्याची चिपळूणकरांनी मुक्तमनाने प्रशंसा करून पाठिंबा व्यक्त केला आहे. या मुद्द्यावर फुले–चिपळूणकर एक होतात.

महाराष्ट्रात गेल्या शतकात राजकारणात जहाल पण समाजकारणात मवाळ असा एक प्रवाह निर्माण झाला. त्याचा म्हणजे जहालांच्या राजकारणाचा उगम बीजभूतपणे निबंधमालेत आढळतो. समाजकारणात चढती बाजू पण राजकारणात पडती व मवाळ बाजू असलेल्या सुधारकांचा व नेमस्तांचा दुसरा वर्ग उच्चभ्रूंतच तयार झाला होता. या दोघांमधील संघर्षाचा प्रथमचा उगम चिपळूणकरांत आढळतो. टिळकांच्या काळात पुढे हे भेद स्पष्ट झाले व संघर्ष उत्तरोत्तर विकोपालाही गेला ! स्वराज्य मात्र हवे होते; पण परंपरागत रूढ हिंदुधर्मात ज्या सुधारणा करणे प्राप्त आहेत, त्या करण्याकडे विशेष जोर देण्याची जरुरी चिपळूणकर यांच्या परंपरेतील टिळकांनाही वाटली नाही; संकुचित हिंदुत्ववादाला मालाकारांनी जन्म दिला. यामुळे "आगरकर, शाहूमहाराज, व पुढे डॉ. आंबेडकर" यांच्यामध्ये व टिळक– चिपळूणकरप्रवाहात खूप फरक पडला व दुरावा निर्माण झाला. फुले व चिपळूणकर यांचा जो पुढील महाराष्ट्रावर परिणाम झाला, त्यातही द्वैत खूपच आढळते. चिपळूणकरांच्या विचारसरणीतून स्वधर्माचा पारंपरिक अभिमान धरणारा व सामाजिक सुधारणांच्या प्रयत्नांना विरोध करणारा अपरिवर्तनवादी पण हिंदुत्ववादी विचारप्रवाह निर्माण झाला. या हिंदुत्ववादी प्रवाहापासून फुले–शाहू–

आंबेडकर यांना मानणारे अलग राहिले आहेत. यापुढे आर. एस्. एस्. व विश्व हिंदु परिषद यांना बहुजनसमाज व दलित–वर्ग यांचा विश्वास संपादण्यासाठी समाजपरिवर्तनाकडे पाठ करिता येणार नाही.

मराठी भाषा समृद्ध व्हावी व तिला विश्वविद्यालयासह सर्वत्र स्थान व मान मिळावा, ही चिपळूणकरांची इच्छा सर्वमान्य होत गेली, वृद्धिंगतही झाली. पण स्वातंत्र्य आल्यानंतर पस्तीस वर्षे होत आली तरी इंग्रजीचा प्रभाव सरकारी कारभारात कायम आहे. इतरत्रही तो सुटत नाही. मराठी भाषेचा विकास व्हावा म्हणून साहित्य–संमेलनाची चळवळ प्रथम उभारणारी मण्डळी समाजसुधारक रानडेवळणाची होती.

खुद्द चिपळूणकरांना चाहणारे साहित्यसम्राट केळकर यांनी जोतीराव फुले यांचा एक उत्कृष्ट व निःपक्षपाती परिचय लो. टि. चरित्राच्या पहिल्या खंडात करून दिलेला आहे; व चिपळूणकरांची फुल्यांवरील सर्वच्या सर्व प्रतिक्रियात्मक टीका सर्वथैव प्रमाण व बिनचूक नव्हती, असेही ध्वनीत केले आहे. चिपळूणकर-टिळक यांच्या काळात फुल्यांची झालेली उपेक्षा पुढे केसरीपरंपरेतही कमी कमी होत गेली आहे; सावरकरांनी तर फुल्यांना 'क्रांतिकारक' म्हटले आहे. तर्कतीर्थांच्या ज्योतिनिबंधाने १९४७ सालापासून म. फुले यांच्याकडे पाहाण्याचा अन्यायी दृष्टिकोण बदलून टाकिला; व नवे युग चालू झाले. 'चिपळूणकर-फुले' हा अभ्यासाचा व चिकित्सेचा विषय झाला आहे. चिकित्सेच्या आड विभूतिपूजा व अंधश्रद्धा येऊ नये.

चिपळूणकरांनी शूद्रातिशूद्र बहुजनसमाजाचे स्फूर्तिदाते नवमार्गदर्शक म. फुले यांच्यावरील टीकेत खूपच अवहेलना केली, म्हणून दलितांसह सर्व ब्राह्मणेतर समाजांत चिपळूणकरांसंबंधी प्रतिकूल मत तयार झाले. पण हाही काळ आता उत्तरोत्तर राहिला नाही. टिळक–चिपळूणकर यांचे कार्य जाणणारे आता वरील सर्व ब्राह्मणेतरात वाढत आहेत. दोन्ही बाजूने दरी भरून येते आहे. तरी चिकित्सक अभ्यास व दोघांच्याही विचारांची तपासणी होऊन दोघांच्या इच्छेप्रमाणे सत्य तेवढेच घेणे पुढील पिढीला कर्तव्याचे आहे. गुणदोषांचा स्वीकार करावा असे असूडाच्या निबंधाच्या प्रस्तावनेत फुले म्हणतात. दोघांच्याही वाङ्मयातून उत्कृष्ट उतारे व उत्तम विचार शोधिता येतात.

## दोघांचे भिन्न भिन्न उद्देश

दोघांकडूनही विषयांतरे झाली, व उद्देश बाजूस सारून उपहासाला महत्त्व दिले गेले. दोघांच्याही अनुयायांनी त्याज्य बाजूचेच जास्ती अनुकरण केले. सत्यशोधक समाजाचा खाली दिलेला उद्देश बऱ्याच अंशी साध्य होऊन गेलेला आहे. ही चळवळ धार्मिक होती, पुढे ती राजकीय झाली! चिपळूणकरांच्या निबंधमालेचा उद्देश आणि गुलामगिरी व ब्राह्मणांचे कसब या पुस्तकांच्या उद्देशांत मुळीच साम्य नाही. "......तो उद्देश मुख्यतः भाषाशोधनाचा तर आहेच. पण त्याबरोबर त्यास ( वाचकास ) मनोरंजन व बोधही काही होईल अशी आशा आहे. यातील मजकूर कोणाच्या द्वेषबुद्धीने आम्ही कधी लिहिणार नाही ... ..." ( पृ. १०१७ )

गुलामगिरीचा उद्देश जोतीबांनीच सांगितला आहे:– "आज शेंकडो वर्षे शूद्रादि अतिशूद्र, ब्राह्मण लोकांचे राज्य झाल्यापासून सतत दुःखे सोशीत आहेत व नाना प्रकारच्या यातनेत आणि संकटांत दिवस काढीत आहेत, तर या गोष्टीकडेस त्या सर्वांचे लक्ष लागून त्यांनी तिजविषयी नीट विचार करणे व येथून पुढे भट ब्राह्मण लोकांचे अन्यायी जुलुमापासून आपली सुटका कशी करून घेणे हाच काय तो आहे." ( म. फुले समग्र वाङ्मय, पृ. ८३ ). 'ब्राह्मणांचे कसब' ह्या पुस्तकाला चिपळूणकरांचे प्रतिस्पर्धी सत्यदीपिकाकर्ते B. P. ( बाबा पदमणजी ) यांनी लहानगी प्रस्तावना लिहिली आहे. "समदृष्टी इंग्लीश सरकारने आपल्या प्रजेतील ह्या ( कुणबी, माळी, मांग, महार ) अति उपयोगी वर्गास विद्या शिकवावी......" असा जोतीबांचा आणखी दुसरा उद्देश सांगितला आहे ( म. फु. स. वा. पृ. ४३ ).

भाषा–शोधन हा निबंधमालेचा मूळ उद्देश भाषा–मराठी–असेपर्यंत स्वीकारार्ह ठरणारा आहे.

दोघांचे मूळ उद्देश अत्यंत मनस्वी भिन्न होते. म्हणून दोघांमधील दुर्मिळ साम्यांपेक्षा वैषम्येच जास्त-


अनुक्रमणिका

वावी लागली. जोतीबांचा उद्देश निबंधमालाकारांना मुळीच गरजेचा वाटला नाही व पसंत नव्हता. "भाषा संशोधन" हा जोतीबांचा उद्देश मुळीच असणे, पूर्ण अशक्य होते. परस्परांचे परस्परांच्या विचारात विळ्याभोपळ्याचे नाते होते. एवढ्या विस्तारांती हाच निष्कर्ष प्राप्त होतो. जोतीरावांच्या विचाराशी चिपळूणकरांनी जी झुंज दिली, तिचे व्यंगपुराणात्मक स्वरूप दिग्दर्शित करावयाचे होते. चिपळूणकरांनी नीट भाषा वापरली असती तर पुढे 'देशाचे दुष्मन' नामक कै. जवळकरांचे जे पुस्तक निघाले ते निघाले नसते ! काही असो, परंतु आधुनिक महाराष्ट्र घडविण्यात दोघांचाही महत्त्वाचा वाटा मात्र सर्वांनाच मान्य करावाच लागतो.

## संदर्भ व टीपा

निबंधमालेतील संदर्भ उद्धृत करताना वासुदेव विनायक साठे यांनी परिश्रमपूर्वक संपादिलल्या तिसऱ्या आवृत्तीमधील (सन १९२६) पृष्ठांक लेखात दिले आहेत. 'आमच्या देशाची स्थिती' या निबंधातील आधार तीन निबंध प्रा. द. ता. भोसले यांनी संपादित केलेल्या प्रथम आवृत्तीमधील घेतले आहेत. या दोन्ही पुस्तकांतील या लेखात जे संदर्भ घेतले आहेत, तेथे तेथे पृष्ठांक खुद्द लेखातच नमूद केले आहेत.

ह्यांखेरीज जरुरीचे संदर्भ खाली दिले आहेत.

१. 'पुणे वर्णन'; ना. वि. जोशी (दुसरी आवृत्ती १९७१); पृ. ८५ ते ९६ अखेर.

२. महात्मा फुले : समग्र वाङ्मय; पृ. १०४.

३. सत्यशोधक हिरक महोत्सव ग्रंथ (श्री. माधवराव बागल संपादित), पृ. ३८, कै. वि. भा. जाधव यांचा लेख.

४. म. फुले यांचे चरित्र; श्री. धनंजय कीरकृत; पृ. ७२.

५. सदर पृ. १६९.

६. History of Marathi Literature ( 1800–1939 ) by Shri G. C. Mate ( Page 108 ).



# सर्जनशील साहित्याचा अनुवाद*

चंद्रशेखर जहागिरदार

मराठीतील सर्जनशील वाङ्मयाच्या अनुवादाची परंपरा १९व्या शतकापासून सुरू होते. एका विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीच्या संदर्भात ही परंपरा सुरू झाली. समर्थपणे स्थिरावलेल्या ब्रिटिशांच्या वसाहतवादातून जित आणि जेते यांच्या संपूर्णतः भिन्न असलेल्या भाषा व संस्कृती यांच्या संकराचा काळ सुरू झाला. जेत्यांची संस्कृती ही युरोपीय प्रबोधनकाळातून बाहेर पडलेली संस्कृती होती. भौतिक शास्त्रे व तंत्रज्ञान यांचा विकास, औद्योगीकरण इत्यादींचा वारसा तिला होता. समृद्ध ललित साहित्याची एक सातत्यशील परंपराही तिला होती. या नवीन संस्कृतीबद्दल वाटणारे कुतूहल, तिचा परिचय करून घेण्याची वाढती प्रवृत्ती यांतूनच अनुवादाच्या कार्याला गती मिळाली. हे कार्य एवढ्या मोठ्या प्रमाणावर झाले, की १९ व्या शतकातील अनुवाद हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय ठरावा.

जित आणि जेते यांच्या विशिष्ट ऐतिहासिक चौकटीमुळे परकीय सर्जनशील वाङ्मयाकडे पाहण्याचा १९ व्या शतकातील दृष्टिकोन हा बव्हंशी भारलेल्या स्वरूपाचा होता. निबंधमालेतील आपल्या "इंग्लिश कविता" या लेखात विष्णुशास्त्री चिपळूणकर लिहितात, "...इंग्लंड देशातील लोकांची, हल्ली मोठ्या परिपक्व दशेत आलेली, जी इंग्लिश भाषा की जिचा सर्व पृथ्वीवर इतका फैलाव होत चालला आहे आणि कवींच्या विशाल व उज्ज्वल कल्पना किंवा तत्त्वज्ञांचे अतिसूक्ष्म व सखोल विचार या दोहोंचा यथास्थित करून तो मनात भरवून देण्याची शक्ती (तिच्या) ठायी विलक्षण असल्यामुळे (ती) विद्यमान भाषांत अप्रतिम होऊन राहिली आहे." परकीय साहित्याबद्दल वाटणाऱ्या या विस्मयाच्या भावनेबरोबरच या साहित्याचा आपल्या राष्ट्रजीवनात कोणत्या प्रकारे समावेश करावा याचाही राष्ट्रवादी प्रेरणेतून विचार होत होता. वर उल्लेखिलेल्या "इंग्लिश कविता" या आपल्या लेखात चिपळूणकर, राष्ट्रजीवनात होणारी ढवळाढवळ आणि कवितेचा उच्चार यांचा प्रत्यक्ष संबंध शोधू पाहतात. या प्रेरणेमुळेच एरवी त्यांना अत्यंत आवडणाऱ्या मोरोपंतांबद्दल सुद्धा, "वामन पंडित, मोरोपंत वगैरे कवींनी जरी मराठी भाषेत आपली कविता लिहिली, तरी ती संस्कृत भाषेच्याच केवळ धाटणीवर असल्यामुळे तीस मराठी कविता म्हणण्यापेक्षा संस्कृत कवितेचे रूपांतर म्हणणे अधिक वाजवी आहे" असे लिहितात. सारांश, १९ व्या शतकातील सर्जनशील वाङ्मयाच्या अनुवादाच्या प्रेरणा या एका परकीय संस्कृती व साहित्य यांबद्दल वाटणारे भारलेले कुतुहल आणि त्याचबरोबर अनुवादकार्यातून स्वभाषेचे, स्वसाहित्याचे हित साधणे– अशा मिश्र स्वरूपाच्या होत्या. स्वभाषेच्या हिताचे हे भान अर्थातच नेहमी राहिले नाही. नंतरच्या काळात भाषांतरे इतकी होऊ लागली, की श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांना भाषांतराचे महत्त्व मान्य असूनही आपल्या खास शैलीत निषेधाचा सूर लावावासा वाटला. आपल्या "संगीत नाटकमय" या लेखात कोल्हटकर लिहितात, "हल्ली भाषांतरांची संख्या कल्पित ग्रंथांपेक्षाही जास्त झाली आहे, हे प्रत्येक भाषाभिज्ञास कबूल केले पाहिजे. हल्ली उठला सुटला तो भाषांतरकार बनतो. आमच्यातील लेखकवृंद हा पुष्कळ अंशी

* दिनांक ६ व ७ डिसेंबर १९८२ रोजी पुणे येथे 'नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया' तर्फे संयोजिलेल्या परिसंवादात वाचला गेलेला निबंध; संयोजकांच्या सौजन्याने नवभारतात प्रसिद्ध करीत आहोत. –संपादक




अनुक्रमणिका

दुसऱ्या ग्रंथकारांचे हुबेहूब प्रतिबिंब उठवणारा ऐने महालच होऊन बसला आहे. "अमक्याच्या तमक्या पुस्तकाच्या आधारे" हे पिंपळपान सांप्रतच्या बहुतेक पुस्तकांच्या शिरोभागी लटकलेले पाहण्यात येते व हे धारण करणारी पोरे खुजट होऊन, दहा-पाच वर्षांच्या आतच राम म्हणण्याच्या पंथास लागतात... ह्या भाषांतराच्या गोडीमुळे आमचे मतस्वातंत्र्य हळूहळू मावळू लागलेले आहे ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे. परावलंबी ग्रंथकारच चोहीकडे पाहण्याची सवय झाल्यामुळे, एखादा कल्पक पुरुष आम्हामध्ये असलाच तर त्याचीही मान्यता होईनाशी झाली आहे. आणि हा आमचा संशयी स्वभाव काही ग्रंथकारांच्या लबाडीमुळे दिवसेंदिवस स्थिर होऊ लागला आहे."

ब्रिटिश अंमलामुळे १९ व्या शतकातील सर्जनशील साहित्याचा अनुवाद हा साहजिकच इंग्रजी भाषा व साहित्य यांपुरता मर्यादित राहिला. महत्त्वाचे म्हणजे गद्याची सातत्यशील परंपरा नसलेल्या मराठी साहित्यात नाटक आणि कादंबरी या दोन वाङ्मयप्रकारांचा अभाव होता. त्यामुळे १९ व्या शतकात सर्जनशील साहित्याच्या अनुवादाची प्रक्रिया या दोन क्षेत्रांत वेगाने सुरू झाली. दशावतारासारख्या लोककला, पौराणिक कथा या मार्गाने मराठी नाटकांचा विकास होत असतानाच तत्कालीन सुशिक्षितांची शेक्सपीयरशी ओळख झाली. साहजिकच शेक्सपीयरच्या नाटकांची भाषांतरे सुरू झाली. पण बुकिश नाटकांच्या काळातील शेक्सपीयरचे सर्व अनुवाद हे रूपांतराच्या स्वरूपातच होते. मूळ कृतीतील आशयाचे आपल्या संस्कृतीला साजेल असे भाषिक प्रक्षेपण हे या रूपांतराचे वैशिष्ट्य होते. असे रूपांतर म्हणजे एक प्रकारचे सांस्कृतिक विधानच होय. यांमध्ये मूळ कृती आणि तिचा अनुवाद यात समानता शोधण्याचा प्रयत्न अधिकाधिक वाचकाभिमुख असे. शेक्सपीयरच्या रूपांतराची ही परंपरा १९ व्या शतकापासून ते थेट आजदेखील शिरवाडकरांच्या ऑथेल्लोपर्यंत दिसून येते.

मराठीतील सर्जनशील वाङ्मयाच्या रूपांतराची ही परंपरा पाहिली की, अनुवादासंबंधीच्या काही समस्या स्पष्टपणे उभ्या राहतात. एक म्हणजे अनुवादस्रोत आणि अनुवाद-लक्ष्यभाषा (Source language and target language) यांतील मूलतःच बिकट असणाऱ्या समानतेच्या प्रश्नाला रूपांतराच्या माध्यमात बरेचसे सोपे उत्तर मिळते. मूळ कृतीतील आशय, त्याला बिलगून असणारे संस्कृतीचे अंग आणि या दोहोंना प्रकट करणारी शैली-या सर्वांना अनुवादलक्ष्य भाषेत समानत्व कसे शोधावे याचे काही सोयीस्कर, वाचकाभिमुख अंदाज रूपांतरकाराला बांधता येतात. विशेषतः मूळ भाषेची संस्कृती अपरिचित असेल तर असे वाचकाभिमुख अंदाज रूपांतरकाराला मानसिक आधार देणारे ठरत असावेत. ॲटनी आणि क्लिओपाट्रा, मॅक्बेथ, ऑथेल्लो, इयागो अशी नावेच सांस्कृतिक दृष्ट्या दूरस्थ ठरत असल्याने वीरमणी व शृंगारसुंदरी, मानाजीराव, महेश्वर, सोमनाथ अशी नावे वापरल्याने अनुवादातील समानत्वाची एक पूर्वअट म्हणून वाचकाशी काही प्रमाणात जवळीक गृहीत धरता येते. मूळ कृतीशी घेण्यात येणारे हे स्वातंत्र्य तिच्या यथामूल भाषांतराच्या अडचणीतून सुटण्याची वाचकसन्मुखता कशी असते याची ही काही मजेशीर उदाहरणे आहेत. शि. म. परांजपे यांनी मॅक्बेथचे मानाजीराव असे रूपांतर केले. त्यातील प्रसिद्ध पोर्टर-सीनचा अनुवाद करताना देवडीवाल्याच्या तोंडी, दारू पिणाऱ्या व मांस खाणाऱ्या तत्कालीन सुधारकांची निंदा करणारी वाक्ये टाकली आहेत. खरी गोष्ट अशी आहे, की १९ व्या शतकापासून सुरू असलेल्या सर्जनशील वाङ्मयाच्या या रूपांतरपद्धतीमुळे मराठीत अनुवादाची सकस, जोरकस अशी परंपरा उभी राहू शकली नाही. महादेवशास्त्री कोल्हटकर, देवल आणि वि. वा. शिरवाडकर या तिघांचीही ऑथेल्लोची रूपांतरे उपलब्ध आहेत. देवलांनी झुंझारराव ही रंगावृत्ती मूळ कोल्हटकरांच्या नाटकावरून तयार केली, तर शिरवाडकरांनी काव्यात्मता हा गाभा मानून ऑथेल्लोचा अनुवाद केला. काव्यात्मतेवर लक्ष ठेवून रूपांतर केल्याने मूळ नाटकातील गौर आणि निग्रो यांतील संघर्षाच्या सांस्कृतिक चौकटीचे रूपांतर आर्य-द्रविड असे झाले. याचा परिणाम असा होतो : आपल्या संपूर्ण नाट्यविश्वात शायलॉक, ऑथेल्लो, कॉलबिन

यांसारख्या अधिकृत संस्कृतीच्या बाहेर असणाऱ्या व्यक्ती व त्यांच्या उपसंस्कृती यांच्या संदर्भात संघर्षाची नाटयबीजे पाहणारा शेक्सपीयर वाचकांपासून दुरावला जातो. रूपांतरामागील सर्जक हेतू स्पष्ट नसल्यामुळे असे होते. जिथे हे हेतू स्पष्ट असतात तिथे रूपांतरे आपल्या मर्यादांपर्यंत यशस्वी होतात असे दिसते. उदाहरणार्थ, "करी मनोरंजन जो मुलांचे। जडेल नाते प्रभूशी तयाचे।" अशा सर्जक हेतूंनी प्रेरित होऊन सानेगुरुजींनी ह्यूगोच्या ला मिझराबलचे दुःखी, फाउस्टचे नदी शेवटी सागराला मिळते, लॅंपलाइटरचे मिरी, अशी सोपी रूपांतरे संस्कारक्षम बालवाचकांसाठी केली. स्वीकारलेल्या उद्दिष्टांच्या मर्यादेपर्यंत ही रूपांतरे यशस्वी आणि लोकप्रिय देखील ठरली आहेत; पण असे काही अपवाद वगळता, आपल्या रूपांतरपरंपरेत रूपांतराचे सर्जक हेतू फारसे स्पष्ट कधीच नव्हते. शेक्सपीयर, मोलीएर, इब्सेन या सर्वांनाच आपण रूपांतरमाध्यमातून पाहिले. सरळ अनुवादाचीच परंपरा राहिली असती तर अभिरूचीचा इतिहास, समीक्षा, वाङ्मयीन प्रभाव या सर्वांबाबत निराळे प्रश्न कदाचित आपल्याला विचारता आले असते.

१९ व्या शतकातील सर्जनशील वाङ्मयाच्या रूपांतराची ही परंपरा कादंबरीच्या रूपांतरातही दिसून येते. फरक एवढाच की कादंबरीतील रूपांतराची ही परंपरा अभिरुचीच्या इतिहासाशी अधिक स्पष्टपणे जोडता येते. ज्या वास्तववादी परंपरेतून कादंबरी या वाङ्मयप्रकाराचा जन्म झाला, तिची मुळे पक्केपणाने रुजलेली नसल्याने अद्भुतरम्य, विलक्षण किंवा फार तर बोधप्रद कौटुंबिक अशा कादंबऱ्यांची रूपांतरे झाली. रेनॉल्डस, गोल्डस्मिथ, मिसेस हेन्रि वुड ही या संदर्भात सहज आठवणारी काही नावे आहेत. पण याच काळात डिकन्सच्या एकाही कादंबरीचे भाषांतर झाले नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे. १९ वे शतक आपण मराठी कादंबरीच्या उदयाचा काळ म्हणून पाहतो. राजवाड्यांनी तर या काळातील कादंबरी समकालीन पाश्चात्य परंपरेच्या संदर्भात पाहिली. इंग्रजीशी परिचित नसलेल्या वाचकाला आजही ते अशक्य आहे. कारण सुसंगत, नियोजित स्वरूपात कादंबरीची अनुवादपरंपरा अजूनही नाही. सर्वांटिस, तुर्गेनेव यांची कांही भाषांतरे उपलब्ध आहेत; पण गोगोल, दोस्तोयवस्की यांचे नाहीत. मध्यंतरी "युसिस"च्या पाठिंब्यामुळे काही अमेरिकन कादंबऱ्यांचे अनुवाद झाले. पण तो पाठिंबा संपताच ते बंद झाले. समकालीनत्वाने सामाजिकतेला सर्वाधिकपणे सामोरा जाणारा कादंबरीसारखा सर्वसमावेशक गद्य वाङ्मयप्रकार भाषांतराचे काही विशेष प्रश्न उपस्थित करतो. विविध वर्णनशैली, बोलीभाषा, निवेदनपद्धती, वाक्यबंधाचे विविधांगी स्वरूप व त्यातून निर्माण होणारी एकूण संहिता तसेच सामाजिक-सांस्कृतिक आचार–या सर्वांसाठी अनुवादलक्ष्य भाषेत मोठ्या पटावर समानत्व शोधण्याची प्रक्रिया कादंबरीच्या अनुवादात दिसून येते. अनुवाद करायचा तो मुळाबरहुकूम, मूळ वाचकांसाठी अभिप्रेत होता त्या स्वरूपात करायचा का, आजचा वाचक व त्याची भाषा यांना डोळ्यासमोर ठेवून करावयाचा? पाश्चिमात्य अनुवादाचा इतिहास पाहिला तर या दोन भूमिकांतून एकेका अक्षरकृतीची विविध भाषांतरे झालेली दिसतात. आपल्याकडे मूळ भाषेतील कृतींचा उपयोग न करता त्यांच्या इंग्रजीतील अनुवादाचाच आधार वापरला असल्या कारणाने या प्रश्नाची सांगोपांग चर्चा अजून झालेली नाही.

अनुवादाची प्रक्रिया ही दोन भिन्नभाषिक कलाकृतींमध्ये शब्द, रूप आणि अर्थ अशा तीन पातळ्यांवर समानत्व शोधण्याचा प्रयत्न करते. केवल अर्थाने असे समानत्व दोन भाषांमध्ये शक्य नसते, तसे तर ते एकाच भाषेतील दोन उच्चारांसाठी नसते. तरी देखील असे म्हणता येईल, की चांगल्या अनुवादाच्या प्रयत्नात समानत्वाचा हा शोध काही सर्जक हेतूंनी प्रेरित झालेला असतो. या सर्जक हेतूंच्या संदर्भात अनुवादाच्या इतरही काही प्रेरणा मग लक्षात येतात. एक म्हणजे एखादा अनुवाद हा तो अनुवादक स्वतः ललित लेखक असेल तर त्याच्या संवेदनशैलीच्या स्वरूपाशी आणि एकूण वाङ्मयीन व्यक्तित्वाशी संबंधित असतो. अशा ठिकाणी लेखक हा इतर वाङ्मयपरंपरेच्या अथवा इतर समान धर्मांच्या संदर्भात स्वतःची व्याख्या करू पाहतो. हा एक प्रकारे आत्मशोधच असतो. आणि प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष रीतीने तो त्या लेखकाच्या

सर्जनशीलतेशी संबंधित असतो. दिलीप चित्र्यांनी केलेले हार्टक्रेन, एझरा पाऊंड, वॉलेस स्टीव्हन्स, आक्टाव्हियो पाझ यांच्या कवितांचे अनुवाद हे अशाच हेतूने प्रेरित झालेले आहेत. स्वतःची संवेदनशैली व भाषिक भान इतर परकीय कवींच्या संदर्भात व्याख्येय करणे, तसेच स्वतःची काव्यपरंपरा इतर परंपरांच्या संदर्भात तपासून पाहणे अशा सर्जक हेतूंमधून हे अनुवाद निर्माण झाले आहेत. फाउस्ट, किंग लिअर यांचे करंदीकरांनी केलेले अनुवाद, मायकोवस्की आणि इब्सेन यांचे सदानंद रेग्यांनी केलेले अनुवाद– ही सर्व सर्जक हेतूंनी प्रेरित झालेल्या अनुवादाची उत्कृष्ट उदाहरणे आहेत. १९ व्या शतकापासून सुरू झालेल्या रूपांतराच्या दुर्बल परंपरेपेक्षा अशा सर्जक हेतूंतून निर्माण झालेल्या प्रामाणिक, सकस अनुवादाची परंपरा सातत्याने व जोरकसपणे चालू राहणे आवश्यक आहे. त्यातूनच मराठी वाङ्मय मर्ढेकरांनी म्हटले त्या अर्थाने पुरेसे परिपुष्ट होऊ शकेल.

वर उल्लेखिलेल्या सर्जक हेतूंचा आणि संबंधित प्रेरणांचा अभाव असेल, तर एकूण अनुवाद-प्रक्रियेलाच एक प्रकारचा कामचलाऊपणा येतो. याचीही उदाहरणे आपल्याला दिसून येतात. उदाहरणार्थ : पु. ल. देशपांड्यांची भावुक मध्यमवर्गीय संवेदनशैली आणि हेमिंग्वेचा रोखठोक, कणखर वास्तववाद ही वस्तुतः दोन विरुद्ध टोके होत. त्याचप्रमाणे ब्रेख्तची सामाजिक बांधीलकी आणि खानोलकरांचा काव्यात्म, प्रतीकवादी पद्धतीने व्यक्त होणारा व्यक्तिवाद या दोहोंत अजिबात साम्य नाही. तरीसुद्धा पु. ल., हेमिंग्वेचा अनुवाद करतात आणि खानोलकर कॉकोशियन चॉक सर्कलचे भाषांतर करतात. सर्जक हेतूंच्या अभावामुळे अशा अनुवादांना फार तर चांगल्या हौशीपणाचे मूल्य असते.

यात भर म्हणून की काय पण सर्जनांतर ( Transcreation ) हा प्रकार काही ठिकाणी सुरू झाल्याचे दिसते. मराठीत अजून तो फारसा प्रस्थापित झालेला नाही. पण तो तसा होऊ नये याचीही काळजी घेणे आवश्यक आहे. कलकत्त्याच्या पी. लाल यांच्या रायटर्स वर्क-शॉपतर्फे सरोजिनी व सुनीती नामजोशी यांनी केलेली गोविंदाग्रजांच्या काही कवितांची सर्जनांतरे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहेत. आपल्या छोटेखानी प्रास्ताविकात सर्जनांतरकार म्हणतात, की संपूर्ण कृती म्हणून गोविंदाग्रजांची कविता याथातथ्यपणे वाचकांपर्यंत जावी यासाठी "मूळातील अनावश्यक ओळी गाळल्या आहेत, काही ओळींच्या मूळ अर्थात बदल केला आहे, इंग्रजीत उचित वाटणार नाहीत असे शब्द व प्रतिमा गाळल्या आहेत, आणि काही वेळा मूळ कवितेतील प्रतिमांना पर्यायी प्रतिमा वापरल्या आहेत किंवा नवीन प्रतिमांची भर घातली आहे." एवढे सगळे सर्जनांतर केल्यानंतर "to convey the poem as a whole as accurately as possible" हा अनुवादकांचा हेतू कसा सिद्धीस जातो हा प्रश्न उरतोच. मग असे दिसून येते की, "गुलाबी कोडे" या मूळ १५ कडव्यांच्या कवितेचे सर्जनांतर चार कडव्यांत Riddle in Pink असे होते; "ओढून जवळी ऐकविला तिस मुकाच कानात" या ओळीचे सर्जनांतर "And smiling he placed a in her ear" असे होते. प्रामुख्याने रुपांतराची परंपरा असलेल्या मराठीत सर्जनांतराची ही फॅशन सुरू झाली तर आपण आहे ती देखील अनुवादाची परंपरा घालवून बसायचो. एवढ्याच हेतूने सर्जनांतराच्या या फुटकळ प्रयत्नाची काहीशी गंभीर दखल इथे घेतलेली आहे.

सर्जनशील वाङ्मयाच्या अनुवादाबाबत एक सर्वसाधारण विधान करता येईल. ते असे, की भाषांतरे ही त्या त्या देशी भाषिकाने ( Native speaker) केलेली असावीत. याची कारणे विविध आहेत. एक तर ज्या भाषिकांसाठी हे अनुवाद होतात त्या भाषांच्या वाङ्मयीन संस्कृतीच्या गरजा त्यांतून स्पष्ट होतात. उदाहरणार्थ, १९ व्या शतकात बाहेरून आलेल्या मिशनऱ्यांनी बायबलची विविध भाषांतरे केली. पण नाटक व कादंबरी या गद्यवाङ्मयप्रकारांची फारशी परंपरा नसलेल्या एतद्देशीयांनी मात्र शेक्सपीयर, रेनॉल्डस इत्यादींना आपल्या भाषेत आणले. दुसरे म्हणजे देशी भाषिकाला ज्या भाषेत अनुवाद करायचा तिचे ग्रांथिक, प्रमाण औपचारिक, बोलीभाषिक, इत्यादी अनेक स्तर माहीत असण्याची शक्यता केव्हाही जास्त असते.

मराठीतील सर्जनशील वाङ्मयाचा अनुवाद-इतिहास पाहिला तर आपला सर्व व्यवहार एकतर्फी आहे हे लक्षात येते. आपण इंग्रजीतील ग्रंथांचे अनुवाद करायचे आणि मराठी वाङ्मयाचे परकीय भाषेत अनुवाद देखील आपणच करायचे असा प्रकार चालत आलेला आहे. गारंबीचा बापू या अनुवाद केलेल्या आणि सध्या भाऊसाहेबांच्या बखरीचा अनुवाद करीत असलेल्या रेसाईडचा एखादा अपवाद वगळता ही परिस्थिती सर्वत्र दिसून येते. काही वर्षांपूर्वी रॉबर्ट ब्लाय या अमेरिकन कवीने टागोरांच्या मूळ अनुवादावरून कबीरांची कविता नव्याने इंग्रजीत आणली. त्यामागच्या त्यांच्या संवेदनशीलतेच्या आध्यात्मिक गरजा लक्षात येऊ शकतात. पण मराठी भाषिकांनी स्वतः इंग्रजीत केलेले अनुवादाचे प्रयत्न फार तर परिचयपर अशा स्वरूपाचे असतात. ज्यांच्यासाठी हे अनुवाद केलेले असतात, त्यांच्या गरजांचा फारसा संबंध इथे नाही. दिलीप चित्र्यांच्या An Anthology of Marathi Poetry सारखा सुसंगत, नियोजित प्रयत्न सोडल्यास अशा स्वरूपाचे बहुसंख्य अनुवाद हौशीपणाच्या पातळीवर असतात. यांतील काही अनुवाद तर मूळ लेखकाविषयी गैरसमज व्हावा इतके वाईट असतात. उदाहरणार्थ, निसिम एझिकेल आणि वृंदा नाबर यांनी केलेला इंदिरा संतांच्या कवितेचा अनुवाद. ही परिस्थिती बदलली पाहिजे हे खरे; पण त्याचबरोबर हेही खरे की, ती बदलण्याची कारणे ही वाङ्मय-बाह्य राहणार. आर्थिक सत्ता म्हणून जपानचे आंतरराष्ट्रीय राजकारणात महत्त्व वाढताच अमेरिकेत जपानी वाङ्मयाच्या अनुवादाची लाट सुरू झाली. खुद्द आपल्याकडेच स्वतः अमेरिकेने पाठिंबा देताच अमेरिकन वाङ्मयाच्या अनुवादाचा वेग वाढला. यावरून अनुवादप्रक्रियेतील बिगरवाङ्मयीन घटकांचे महत्त्व लक्षात येते.

सर्जनशील वाङ्मयाच्या अनुवादाची ही परंपरा आपण परकीय भाषा व साहित्य यांच्या संदर्भात पाहिली. भारतीय भाषांच्या संदर्भात अनुवादाची परंपरा तुलनात्मक दृष्ट्या जास्त जोमदार आहे असे म्हणावे लागेल. याची कारणे अनेक आहेत. एक म्हणजे परकीय भाषा व साहित्याचे अनुवाद करताना मुळातच असणाऱ्या सांस्कृतिक भिन्नतेमुळे रूपांतराची परंपरा फोफावली. तिची इथे गरज भासली नाही. उलट सांस्कृतिक एकसंधतेमुळे भारतीय भाषांच्या संदर्भात अस्सल अनुवादाचीच परंपरा निर्माण झाली. तिची उदाहरणे आपटे व वरेरकर यांनी केलेल्या अनुक्रमे बंकिमचंद्र व शरच्चंद्र यांच्या अनुवादांपासून ते थेट आज अशोक शहाण्यांपर्यंत दिसून येतात. बंगालीच्या अनुवादाची ही उदाहरणे असली तरी हिंदी, कन्नड, उर्दू इत्यादी भाषांबाबतही अनुवादाची फार सातत्यशील नसली तरी चांगली परंपरा आहे. भारतीय भाषांमधील सर्वच नसल्या तरी बऱ्याचशा आधुनिक अक्षरकृती आज आपल्याला अनुवादरूपात वाचता येतात. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे भारतीय भाषांच्या संदर्भात असणारी अनुवादपरंपरा बऱ्याच प्रमाणात दुतर्फी आहे. परकीय सर्जनशील वाङ्मयाच्या अनुवादात जशी ती एकतर्फी आहे तशी ती इथे नाही. खांडेकरांसारखा एखादा लेखक तामीळ, गुजराथी, हिन्दीमध्ये मोठ्या प्रमाणात अनुवादित होतो हे या दुतर्फी परंपरेचेच एक उदाहरण आहे. तिसरे म्हणजे एखादा लेखक संपूर्णपणे भाषांतरित करण्याची परंपरा इथे काही प्रमाणात का होईना पण दिसून येते. आपट्यांनी केलेला संपूर्ण बंकिमचंद्र हा अनुवाद किंवा वरेरकरांनी केलेली शरच्चंद्राची भाषांतरे ही याची चांगली उदाहरणे आहेत. आपल्या प्रत्येक भाषेच्या वाङ्मयीन संस्कृतीच्या भारतीयत्वाची ओळख करून घ्यावयाची असेल तर अशा अनुवादाची आणि तिला पूरक अशा अनुवादसमीक्षेची परंपरा जाणीवपूर्वक जोपासली गेली पाहिजे.



अनुक्रमणिका






# ' दासशूद्रांची गुलामगिरी ' च्या डॉ. गांगलकृत परीक्षणावरील प्रतिक्रिया

शरद् पाटील

'अशा प्रकारे इंग्लंडात उल्लेखनीय वस्तुस्थिती ही दिसते की, समाजात ज्या वर्गाचे स्थान जेवढे जास्त खालचे व तो जेवढा जास्त अशिक्षित– या शब्दाच्या रूढ अर्थी– तेवढा तो प्रगतीशी जास्त निगडित, तेवढे त्याचे भवितव्य जास्त मोठे. हे वैशिष्ट्य सर्वसामान्यपणे प्रत्येक क्रांतिकारी युगाचे असते.'

– फ्रेडरिक एंगल्स

* * *

प्रा. मे. पुं. रेगेंनी मला ता. २९–११–८३ ला पाठवलेल्या पत्रात डॉ. बाळ गांगलांचे परीक्षण 'बरेच कडक' असल्याचे खालीलप्रमाणे कळवले होते–

'... तुमच्या पुस्तकाचे सविस्तर व चिकित्सक परीक्षण झालेलेच नाही असे मला वाटते. मला तरी असे परीक्षण लिहू शकेल अशा ताकदीचा अभ्यासक शास्त्रीजींशिवाय दिसत नाही. तुम्ही जर अशी नावे सुचविली तर त्यांना मी जरूर विनंती करीन. डॉ. गांगल (मुंबई विद्यापीठ) यांनी त्यांचे एक परीक्षण पाठवले आहे. ते बरेच कडक आहे. त्याला तुम्ही अर्थात उत्तर देऊ शकाल. रॉल्सच्या 'थिअरी ऑफ जस्टिस' ह्या पुस्तकावर अनेक विद्वानांनी केलेल्या भाष्यांचा संग्रह पुस्तकरूपाने इंग्रजीत प्रसिद्ध झाला आहे. तसे एखादे पुस्तक तुमच्या पुस्तकावर काढता येईल. पण अडचण अशी आहे, की हे करणारे लेखक कुठे आहेत ?'

डॉ. गांगलांचे परीक्षण, माझ्या मते, 'कडक' नाही. डॉ. मेहेंदळेंचे परीक्षण खरेखुरे कडक होते. वैदिक व्याकरणाचे व भाष्याशास्त्राचे अनेक मूलभूत प्रश्न त्यांनी उपस्थित केले. त्यांच्या गाढ विद्वत्तेपुढे विनम्र होऊनच मी त्यांच्याशी वाद केला. एवढेच नाही. शास्त्रीजी महाराष्ट्र साहित्य – संस्कृती मंडळाचे अध्यक्ष असता माझ्या पुस्तकाचे हस्तलिखित डॉ. मेहेंदळेंकडे पाठवले गेले होते. त्यांचा सटीक पण प्रशंसापर अभिप्राय प्राज्ञपाठशाळेने माझ्याकडे ता. ३०-१०-७९ ला पाठवला. त्यात त्यांनी मी 'दुर्ग' ऐवजी 'दुर्गा' व 'त्वष्टृ' ऐवजी 'त्वष्ट्र' असे चुकीचे शब्दप्रयोग का करतो असे सभ्यपणे विचारले होते. तसेच 'ब्राह्मण' (ग्रंथ) हा शब्द संस्कृतात नपुसकलिंगी असून मी तो पुल्लिंगात वापरतो असा आक्षेप त्यांनी नवभारतातील परीक्षणात घेतलेला आहे. अभिप्रायाला दिसलेल्या उत्तरात मी त्या चुका मान्य केल्या होत्या. माणसाच्या सापेक्ष ज्ञानप्राप्तीचा रस्ता सापेक्ष अज्ञानमान्यतेतून बनत असतो असे मी मानतो. पण ही प्रांजल विनम्रता मी पाठीचा कणा न मोडता अंगिकारलेली आहे.

त्वष्टृ अशी मी हस्तलिखितात सुधारणा केली; पण काही ठिकाणी चुका राहून गेल्या. दुर्गाचा दुर्ग करताना माझ्यापुढे प्रश्न आला, की अशी चूक माझा शूद्रातिशूद्र वाचक साहजिक करील. म्हणून, अशा सर्व संस्कृत शब्दांना प्राकृतिक रूपात लिहून त्यांना हिंदीप्रमाणे प्रत्यय लावायची पद्धत मी स्वीकारली. पुस्तकवाचक शब्द मराठीत नपुसकलिंगाप्रमाणे पुल्लिंगीही आहेत. म्हणून, पुस्तकवाचक संस्कृत शब्द मी या दोन्ही लिंगांत घेतलेले आहेत. संस्कृतात शब्दांचे लिंग नियत नसते. उदा., ऋषि हा शब्द पुरुष-ऋषीप्रमाणे स्त्री-ऋषीलाही योजला जातो. प्रजापति हा संस्कृत शब्द पुल्लिंगी आहे, तर पजापतिको हा पालि शब्द स्त्रीलिंगी. प्रजापति मूलतः व प्रत्यक्षतः स्त्रीच असू शकते हे पुरुषसत्तावादी पंडितही नाकारणार नाहीत.

विदर्भात व इतरत्र स्त्री स्वतःबद्दल पुल्लिंगात बोलते तर पुरुषाबद्दल नपुसकलिंगात बोलले जाते !

या संदर्भातच गणमाता हा शब्द घेतला पाहिजे. कम्यूनल स्लेव्हसाठी गणदास हा शब्द मी बनवलेला आहे. पण, पालीत विशाखा मृगारमातेच्या संदर्भात गणदासी हा शब्द एकदा योजलेला गेलेला आहे. यावरून अनुमान काढता येईल की, गणदास हा शब्द केव्हातरी योजला जात असावा, नंतर तो लुप्त झाला. ज्ञातिदासी, कुलदासदासी हे शब्द संस्कृत वा पालि साहित्यात आलेले आहेत आणि ते कम्यूनल स्लेव्हवाचक आहेत हे कोणीही सुबुद्ध माणूस नाकारणार नाही. भारतीय सामंतप्रधान जातिव्यवस्थेतील बलुतेदारकी वा गावकामगारकी ही कम्यूनल सर्व्हन्ट्सची प्रथा कम्यूनल स्लेव्हरीचाच अवशेष आहे. गणकर्म हा शब्द गणाने करायच्या भौतिक व मायिक कर्मासाठी वैदिक साहित्यात वारंवार आलेला आहे. गणमाता हा शब्द वैदिक साहित्यात नाही हे खरे. तो शब्द वाचकांना सहज समजू शकतो म्हणूनच मी बनवला. असामासिक अवस्थेतले गण व मातृ हे शब्द वैदिक आहेत. पण गणमातावाचक सामासिक शब्द वेदात नाहीत असे नाही. उदा., विश् + पत्नी. पति व पत्नी या शब्दांची व्युत्पत्ती एकच असल्याचे 'देवपत्न्यः' च्या संदर्भात वि. का. राजवाडे सांगतात. हा उल्लेख मी नवभारतच्या एप्रिल ८३ अंकातील माझ्या लेखात केलेला आहे. या संदर्भात विश्पत्नीचा अर्थ होतो विशचे वा गणाचे पालन करणारी, गणमाता. वैदिक संस्कृतात अनेक शब्द प्राकृतातून आलेले आहेत आणि लॅटिनप्रमाणे ती अनेक भाषा व बोलीभाषांची मिळून झालेली असल्यामुळे तीत नियमांप्रमाणे अपवादांची भरमार आहे. पालीत पति शब्दाचा अर्थ स्त्री होत असल्याने गणपति, गणाधिपति, विश्पति यांसारख्या शब्दांचा मुळात गणमातेसाठी वापर होत असल्याची शक्यता नाकारता येत नाही. वैदिक साहित्यात गणदेवी हा शब्द नसला, तरी सुरत जिल्ह्यात तापीकाठच्या एका आदिवासी भिल्ल गावाचे नाव गणदेवी आहे. संस्कृततातला मा हा नकारार्थी शब्द भिलोरी भाषेत प्रचलित आहे, तसाच पालीतला थेरी हा शब्द.

वैदिक कर्मकांडात कुलापासून गणाने करायचे यज्ञ सांगितलेले आहेत. केरलपुत्रांच्या गणयज्ञीला महामखम् म्हणत आणि त्यांचे कुल व ज्ञातियज्ञही होते. या कुल व ज्ञातींच्या महामखम्पासून वेगळा व महत्तम यज्ञ या संदर्भात मी महान्तम शब्द मुद्दाम योजलेला आहे. 'पहाण', 'रहाणे' असे शब्द 'पाहाणे', 'राहाणे' असे कलोक्विअल लिहायचा आग्रह मी धरलेला आहे. असे शैलीचे स्वातंत्र्य प्रत्येक लेखकाला असते, असावे. हे नाकारायचे असेल तर आजची मराठी अशुद्ध मानून जुन्या मराठीकडे परत फिरावे लागेल.

डॉ. गांगलांचे सबंध परीक्षण टवाळीचे आहे. एका बाजूला माझ्या पुस्तकाला अभिप्राय देणाऱ्यांना ते महापंडित म्हणतात, तर दुसऱ्या बाजूला अभिप्राय पुस्तक, परत्वे हे महापंडित, प्रचंड निराशाजनक असल्याचा उपोद्घात करतात. हे अभिप्राय पुस्तक प्रसिद्ध व्हायच्या कितीतरी वर्षे आधी, केवळ हस्तलिखित वाचून, दिले गेलेले आहेत– प्रा. रेगेंनी ता. १९-८-८० ला, तर डॉ. धर्मेन्द्रनाथ शास्त्रींनी ता. ३-११-७४ ला. ता. १५-६-७५ ला अभिप्राय पाठवणाऱ्या डॉ. इर्फान हबीबांची व माझी अजून भेटसुद्धा नाही. शास्त्रीजींची व माझी पहिली भेट हे पुस्तक नवभारतात ७५ ते ७७ दरम्यान क्रमशः प्रसिद्ध होऊन गेल्यानंतर धुळ्याला झाली. मरासासंमला सादर केला गेलेला अभिप्राय डॉ. मेहेंदळेंचा असल्याचे मला माहीत नसल्याने तो मी अभिप्रायसमुच्चयात समाविष्ट केला नाही. त्यांचा अभिप्राय खालीलप्रमाणे–

'...त्या विषयावरील मराठीत हा पहिलाच ग्रंथ असावा असे वाटते... त्यात नवे विचारही आहेत. लेखनाचे साहित्य जमविण्यासाठी बरेच परिश्रम केले आहेत. त्यांनी वाचन भरपूर केले आहे. संस्कृत–पाली ह्या भाषांतले ग्रंथ व त्यांवरील पुस्तके ह्यांतून त्यांनी संदर्भ गोळा केले आहेत ... ग्रंथविषयाची मांडणी पद्धतशीर आहे. त्यातील प्रतिपादन सर्वांना पटेलसे नसले तरी ते समर्पक आहे... लेखनशैली चांगली आहे... लेखनाची भाषा सुबोध आहे...'

मी सत्तामत्ताधारी नाही, विरोधी पक्षाचा एक जीवनदानी शूद्र कार्यकर्ता आहे. मग, या महापंडितांनी कोणत्या दडपणाने वा प्रलोभनाने हे प्रशंसापर

अभिप्राय दिलेले आहेत, हे डॉ. गांगल सांगू शकतील काय ?

* * *

डॉ. गांगलांना मार्क्सवादाची फुले-आंबेडकरवादाशी सांगड घालणे इष्ट वाटत नाही, गल्लत करणे वाटते. जगभरचे कम्युनिस्ट -त्यांत भारताचे आले- मार्क्सवादी तत्त्वज्ञानाला मार्क्सवाद-लेनिनवाद म्हणत आले. लेनिनचे योगदान मार्क्सवादी अर्थशास्त्र, राजकारण व समाजक्रांतीचा व्यवहार यांतच कसे आहे, मार्क्सवादी तत्त्वज्ञानात कसे नाही, हे मी सुधीर बेडेकरांना दिलेल्या उत्तरमालेत सिद्ध केले आहे (तात्पर्य, जाने. ८१; पूर्वा, डिसें. ८१; व 'सत्यशोधक मार्क्सवादी', सप्टें. ८२). मार्क्सवादी तत्त्वज्ञानाचा विकास लेनिनपाशीच थांबला, असे भारताचे नवब्राह्मणी कम्युनिस्ट ठामपणे गृहीत धरून बसले आहेत. त्यांचे डॉ. गांगल हे जातवाले असल्यामुळे त्यांनी मार्क्सवाद व लेनिनवाद यांच्या सांगडीला कधीही अनिष्ट वा गल्लत म्हटलेले नाही. फुले व आंबेडकर हे तत्त्वज्ञानी होते हे मी सिद्ध करीपर्यंत डावी चळवळ-कम्युनिस्ट व समाजवादी दोघेही-त्यांना तत्त्वज्ञानी मानायला तयार नव्हते. बेडेकरांनी तर इथपर्यंत मजल गाठली होती की, एक वेळ मार्क्सवाद-लेनिनवाद व माओवाद यांचा समन्वय मान्य करू, पण मार्क्सवाद व फुले-आंबेडकरवादाचा नाही. आता माकप च्या बसवपुन्नयांनी माओने केलेले अनित्यतावादाच्या ( dialectics ) विरोधाच्या (contradiction) नियमाचे मौलिक विवरण खोडून काढण्यासाठी कडाडून हल्ला केला आहे (सोशल सायंटिस्ट, सप्टें. ८३). या हल्ल्याचा उद्देश माओचे फलदायी विवरण जातिव्यवस्थेच्या प्रश्नाच्या अपारंपरिक सोडवणुकीला लावले जाऊ नये हा आहे. या उद्देशाची गृहीत भूमिका ही आहे की, मार्क्सवादी तत्त्वज्ञानासारख्या कामगारवर्गीय तत्त्वज्ञानाचाही विकास बुद्धिजीवी वर्गीयाशिवाय वा जातीयाशिवाय होऊ शकत नाही. मग, त्याचा विकास माओसारखा 'पांसुलपादको हालिक:' करूच कसा शकतो ? माकपच्या नंबुद्रिपादांच्या 'सिद्धान्ताप्रमाणे' भारतीय संस्कृती केवळ उच्चजातीयांनीच निर्मिलेली असल्यामुळे भारतात मार्क्सवादी तत्त्वज्ञानाच्या पावित्र्याची 'रखवालदारी' ब्राह्मणांशिवाय कोणीच करू शकत नाही. या रखवालदारीला डॉ. गांगल हातभार लावीत आहेत.

माझी मार्क्सवादी-फुले-आंबेडकरवादी अन्वेषणपद्धत अनिष्ट व गल्लतकारक आहे एवढेच डॉ. गांगलांनी म्हणून भागणार नाही. कोणतेही 'शुद्ध' तत्त्वज्ञान गल्लत नसते हे त्यांना प्रथम सिद्ध करावे लागेल. खुद्द मार्क्सचे तत्त्वज्ञान राजनिष्ठ अध्यात्मवादी हेगेल याचा अनित्यतावाद व भांडवलदारी लोकशाहीवादी फायरबाख याचा यांत्रिक भौतिकवाद यांच्या 'गल्लतीतून' तयार झाले. डॉ. गांगलांना परमपूज्य असलेला शांकर अद्वैती ब्रह्मवादही भिक्षुकी-भिक्षूंचा सांख्य, औपनिषदीय राजर्षी-ब्राह्मणांचा अध्यात्मवाद व बौद्ध महाथेरांचा शून्यवाद-विज्ञानवाद यांच्या 'गल्लतीतून' बनलेला आहे.

*

मार्क्सवाद-फुले आंबेडकरवाद हा मार्क्सवाद व फुले-आंबेडकरवाद यांची गोळाबेरीज नाही, तर एक स्वतंत्र तत्त्वज्ञान आहे. कारण ते- १) वर्गान्तिक एकप्रवाही ऐतिहासिक भौतिकवादाऐवजी जातिवर्गस्त्रीदास्यान्तक बहुप्रवाही ऐतिहासिक भौतिकवादाची मांडणी करून भारतीय इतिहास व समाज यांना लावून दाखवते; २) मार्क्सवादी तत्त्वज्ञानाच्या प्रतिबिंबवादी प्रमाणशास्त्राऐवजी अनित्यात्मक प्रमाणशास्त्रांचा अंगिकार करते; ३) अनित्यतावादाचा पायाभूत नियम असलेल्या विरोधाच्या संकल्पनेची आणि तिच्या वैमनस्यभावी व अवैमनस्यभावी रूपांची ऐतिहासिक विकासक्रमात व अन्योन्यसंबंधांत प्रथमच मांडणी करून वर्गविरोध, जातिविरोध व स्त्रीपुरुषविरोध यांच्या सोडवणुकीला लावून दाखवते; ४) मार्क्सवादी सौंदर्यशास्त्रापेक्षा वेगळे व जास्त सम्यक् सौंदर्यशास्त्र मांडून ते कलावस्तूंना लावून दाखवते.

*

डॉ. गांगलांनी गांधी - हिटलर - माओवाद यांसारखी विदूषकी शेरेबाजी करण्यापेक्षा मार्क्सवादी-फुले-आंबेडकरवादी तत्त्वज्ञानाच्या खंडनात उतरावे !

* * *

अनुक्रमणिका

अस्पृश्यता व गुलामगिरी हे विषय डॉ. गांगलांच्या 'डोक्याला अत्यंत पीडा' देतात, 'अंतःकरणाला वेदना' देतात आणि त्यांची 'बुद्धी कुंठित' करतात. हे प्रश्न त्यांना परब्रह्माप्रमाणे अनिर्वचनीय व अज्ञेय वाटतात एवढेच नव्हे, तर ते सोडवू पाहाणाऱ्यांनाही वाटावेत अशी त्यांची इच्छा आहे. या प्रश्नांनी त्यांची बुद्धी कुंठित झालेली असूनही दासशूद्रांनी ऊर फुटेतो श्रम केलेच नाहीत असे ते निर्ढावलेपणे म्हणतात. माझ्या पुस्तकाचे उद्गायन करणाऱ्या महाभारतीय श्लोकात वैश्य तुलाधार तमोन्मत्त जाजलि ब्राह्मणाला सांगतो की, माणसेच माणसांना गुलाम करून त्यांना प्राणांतिक यातना देतात, साखळदंडात जखडतात, तुरुंगात सडवतात व रात्रंदिवस राबवतात: – 'वध–बन्ध–निरोधेन कारयन्ति दिवा–निशम् ।'

'अंकल टॉम्स केबिन' मध्ये नीग्रो गुलामांना उरी फुटेतो राबवले जाताना दाखवले आहे. अॅलेक्स हॅलेच्या 'रूट्स' चे अमेरिकन टीव्हीवर झालेल्या झालेल्या शोचे टोनी लारिआने केलेले परीक्षण ता. ५–११–७८ च्या टाइम्स ऑफ इंडियात प्रसिद्ध झालेले आहे. प्रस्तावनेत तो म्हणतो की, एका काळ्या कुटुंबाच्या सहा पिढ्यांवरील या महाकाव्याने नव्या जगाच्या भरभराटीला दासश्रमाची पाशवी व्यवस्था कशी कारणीभूत होती याची विदारक जाणीव अमेरिकनांना करून दिली आहे. या लेखात दोन तत्कालीन रेखाचित्रे दिलेली आहेत एक आहे गुलामांच्या बाजाराचे आणि दुसरे कपाशीच्या शेतात गोऱ्या मुकादमाच्या चाबकाच्या फटकाऱ्यांखाली काम करणाऱ्या नीग्रो कृषिदासींचे.

इतिहास नावाचे शास्त्र या देशात प्रथम तुर्कांनी आणल्यामुळे भारतीय गुलामगिरीचे असे साक्षात वृत्तांत उपलब्ध नाहीत. तरीही चाणक्याचा (इसवीपूर्व ३००) अर्थशास्त्रातील उपदेश कल्पना देऊ शकतो. राजाचे सामर्थ्य खजिन्यात असते आणि खजिना खाणींनी भरला जातो, असे तो सांगतो. या खाणींत काम करायला अपराधी ब्राह्मण व राजाधिकारी आणि तुरुंगातील धट्टेकट्टे कैदी यांना डबल साखळदंडांनी जखडून न्यावे असा तो उपदेश करतो–

(अतुष्यतः) गुप्तपुत्रदारान् आकर–कर्मान्तेषु वा वासयेत् । १.१३

स्तेनम् अनिसृष्टोपजीविनं च बद्ध्वा कर्म कारयेत्, दण्डोपकारिणं च । २.१२

ब्राह्मणं पापकर्माणम् उद्घुष्य अंक–कृत–व्रणम् ।
कुर्यान् निर्विषयं राजा वासयेद् आकरेषु वा ॥ ४.८

कैदी हे राजाचे दंडदास असत. इसवी पूर्व १ ल्या शतकात इजिप्शियन व स्पॅनिश सोनेचांदीच्या खाणीत दंडदास व युद्धजित दास यांच्याकडून उरी फुटून मरेतो कसे काम करून घेतले जाई याचे विदारक वर्णन दियोदोरसने केलेले आहे (जॉर्ज थॉमसन, एस्किलस अॅण्ड अथेन्स, पा. १४९–१५१). भारतीय खाणींमधले काम एवढे पाशवी नव्हते असे तरीही डॉ. गांगल म्हणतील !

कारूनारू व बलुतेदार 'अगदी शोषित होते असे मानले तरी– 'ऊर फुटेतो' काम करीत होते आणि 'गुलाम' होते, असली विधाने करण्यास काडीमात्र आधार नाही' असे डॉ. गांगल म्हणतात माझ्या पुस्तकाच्या दोन्ही भागांचा विषय बुद्धपूर्वकालीन दासशूद्रप्रथाक **वर्णसमाज** आहे. गुलामश्रमावर आधारलेल्या या समाजात कारूनारू व बलुतेदार जाती असू शकत नव्हत्या. या जाती बुद्धोत्तर सामंतप्रथाक **जातिसमाजाची** अपत्ये आहेत. 'त्यांना मी गुलाम म्हणतो', असा खोटा अध्यारोप डॉ. गांगल माझ्यावर करीत आहेत. या जातींकडून कसे ऊर फुटेतो काम नवोदित सामंतप्रथाक जातिसमाज करून घ्यायला लागला होता याचे बुद्धोक्त वर्णन पी. सी. जैनंनी त्यांच्या 'लेबर इन एन्शंट इंडिया' मध्ये उद्धृत केले आहे. राजगृहाबाहेरच्या कोष्टयांच्या वस्तीत–

'. वृद्ध तंतुवायही– वयाने गलितगात्र झालेले, सर्व दात पडून गेलेले, सर्व केस पांढरे झालेले, शरीरे वाकून व **मोडून गेलेले**– सूत कातताना व त्यांच्या वृद्ध बायका नऱ्या भरताना दाखवलेले आहेत. त्या वयात शारीरिक कष्टाचे काम करीत असलेल्या दोन तंतुवायांना पाहून बुद्धाच्या तोंडून उद्गार बाहेर पडले– "या नगरात या दोषांपेक्षा

अनुक्रमणिका

दरिद्री माणसे नाहीत हे निःसंशय" ... ( जाड ठसा माझा ).

तुर्कपूर्व भारतीय समाजात सर्व उत्पादक जाती अस्पृश्य बनवल्या जाऊन 'शरीरे मोडेपर्यंत' राबायला शहरकुसांबाहेर फेकल्या गेल्याने तुर्कविजयानंतर त्या मुसलमान बनून गावकुसांत आल्या, असे मोहम्मद हबीब अल् बिरूनीचा हवाला देऊन सांगतात ( पॉलिटिक्स अँड सोसायटी ड्यूरिंग द अर्ली मीडिव्हल पीरिअड, पा. ६१-६७, ७२ ). सबंध मुघल काळातील शूद्रातिशूद्रांचे ऊर फुटेतो मेहनतीचे, वेठबिगारीचे व सारा न भरल्यास कुणबी कुटुंबे गुलामांच्या बाजारात विकली जायचे वर्णन इर्फान हबीबांच्या 'द अग्रेरियन सिस्टीम ऑफ मुघल इंडिया' या ग्रंथात डॉ. गांगलांनी वाचावे. या पाशवी जीवनाचे दायित्व ते केवळ मुसलमानांवर फेकतील. म्हणून, खुलासा केला पाहिजे की, शहरांत प्रत्यक्ष शासन मुसलमान सामंतांचे होते, तर बहुतेक ग्रामीण भागांत हिंदू सामंतांचे. पेशवेकालीन 'स्वराज्यासाठी' त्यांनी वाचावीत डॉ. पी. ए. गवळींची 'पेशवेकालीन गुलामगिरी व अस्पृश्यता' आणि 'पेशवेकालीन समाज व जातीय संघर्ष' ही पुस्तके. वासाहतिककालीन जीवनासाठी फुले. आधुनिक काळातील अस्पृश्यांच्या जीवनासाठी खरात व बाबूराव बागुल. मध्य व उत्तर भारतातील अस्पृश्य अजूनही स्वातंत्र्यपूर्वकालीन जीवन जगत आहेत. अस्पृश्यता ही भारताबाहेर कोठेही नाही. पण, तरीही डॉ. गांगल म्हणतात की, 'भारताने काही विशेष दुष्ट प्रथा जन्माला घातली असे नव्हे.'

'प्राचीन भारताचे पहिले धननिर्मिते- वरकड मालाच्या अर्थी- दास व शूद्र होते. सुमारे ३००० वर्षे त्यांनी ऊर फुटेतो, अखंडपणे केलेल्या श्रमांनी जी महान भारतीय संस्कृती जन्माला घातली व पोसली, तिनेच त्यांच्या गुलामगिरीच्या बेड्या घडवल्या व घट्ट केल्या'- अशी पुस्तकाची सुरुवात करणाऱ्या वाक्यात 'अनाठायी आक्रस्ताळेपणा आणि अयोग्य दोषारोप ठासून भरलेले आहेत', असा डॉ. गांगलांचा माझ्यावर दोषारोप आहे. मी भारतीय संस्कृतीची डायलेक्टिकल वस्तुस्थिती मांडलेली आहे.

* माझा दोषारोप सबंध भारतीय संस्कृतीवर असूच शकत नाही. कारण डॉ. गांगलांप्रमाणे मी ती एकात्म मानीत नाही. ती सापेक्ष समतावादी वा अब्राह्मणी आणि विषमतावादी वा ब्राह्मणी या दोन विरोधी प्रवाहांनी मिळून बनलेली आहे आणि या विरोधांच्या एकजुटीतील संघर्ष-संग्रामातून एकूण भारतीय संस्कृतीचा विकास झालेला आहे, हे मी १ ल्याच प्रकरणाच्या शेवटी स्पष्ट केलेले आहे. या विकासाला कारणीभूत केवळ एकच पक्ष- अब्राह्मणी पक्ष- नाही, तर दोन्हीही पक्ष आहेत, हे मी त्या वाक्यातच स्पष्ट केलेले आहे- 'हे दोन्ही प्रवाह : अब्राह्मणी व ब्राह्मणी, सबंध भारतीय इतिहासभर जोडीने वाहात गेले आहेत, झगडत, परस्परांवर प्रभाव पाडीत व विधायक **नकारक्रिया करीत** (sublating)'.

* पण, ऐतिहासिक वस्तुस्थिती समजून घेणारा कोणताही माणूस तटस्थ राहूच शकत नाही. तो वर्तमान वस्तुस्थितीत एक तर जैसे थे चा पुरस्कर्ता असतो किंवा जैसे थे विरोधाचा. कर्णार्जुन युद्ध सुरू झाल्यानंतर ( पुरुषसत्ताक ) आकाश देवाने कर्णाची बाजू घेतली, तर ( स्त्रीसत्ताक ) भूदेवीने अर्जुनाची, असे व्यास सांगतात. त्याप्रमाणे वर्तमान भारतीय समाजातील संघर्षाचे पक्षपाती हे भारतीय इतिहासातील या दोन प्रवाहांपैकी या ना त्या प्रवाहाचा पुरस्कार अटळपणे करतात. पुरस्कारांचा हा संघर्ष इतिहासाच्या आकलनाचाच संघर्ष असतो. डॉ. गांगलांचे भारतीय इतिहासाचे आकलन ब्राह्मणी असणे जेवढे स्वाभाविक आहे, तेवढेच माझे आकलन अब्राह्मणी असणे. म्हणून, त्यांनी माझे इतिहासाकलन 'आक्रस्ताळी' असल्याचा दोषारोप करून भागणार नाही, तर ते अयथार्थ असल्याचे सिद्ध केले पाहिजे.

उपरोक्त दोन वाक्ये डॉ. गांगलांना आक्रस्ताळी वाटतात; तर डॉ. धर्मेन्द्रनाथ शास्त्रींना ती दलित पँथरचा उदय अटळ करणाऱ्या हिंदुत्ववादाची यथार्थता दाखविणारी वाटतात. ता. ३-११-७४ च्या अभिप्रायात ते म्हणतात-

'...This is indeed a very realistic statement on Hiuduism which hypo-

critically talks of the whole world as a family (वसुधैवकुटुम्बकम्)..No wonder that this hypocritical attitude of Hinduism has been fully realised by the depressed class people and now they have formed an army called Dalit Panther...'

दलित पँथरचा त्यावेळी नुकताच उदय झाला होता, हे लक्षात घेतले पाहिजे. महामहोपाध्याय डॉ. शास्त्री हे केवळ उच्चजातीय पंडित आहेत एवढेच नाही, तर त्यांचा 'क्रिटिक ऑफ इंडियन रिॲलिझम' हा ग्रंथ जगभरच्या प्राच्यविद्याविदांत त्चेर्वात्स्कीच्या 'बुद्धिस्ट लॉजिक' खालोखाल मानला जातो. ते भारतीय तत्त्वज्ञानांत बौद्ध तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते असल्यामुळे भारतीय इतिहासात व वर्तमान समाजात त्यांनी अब्राह्मणी पक्ष उचलून धरणे अपरिहार्य ठरते.

शोषणाशिवाय संस्कृती कोठेही विकसित होऊ शकलेली नाही या मार्क्सच्या वस्तुनिष्ठ निष्कर्षाचा हवाला देऊन डॉ. गांगल त्याच्यावर अध्यारोप करतात की, या शोषणाबद्दल उदासीन निर्विकारतेची भूमिका घेणेच त्याला अभिप्रेत होते–

'... मार्क्सने 'दास कापिताल' मध्ये म्हटले आहे, "All surplus value, whatever particular (profits, interest or rent) it may crystalize into, is in substance the materialization of unpaid labour." मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणे कुणाकडून तरी वेतनविरहित काम करून घेतल्याखेरीज वरकड माल पैदा होत नाही. वरकड माल उत्पन्न झाल्याखेरीज संस्कृतीची विविध अंगे– धर्म, वाङ्मय, कला शास्त्रे, न्यायव्यवस्था– जोपासण्यासाठी लागणारा वेळ **समाजाच्या काही घटकांना मिळत नाही.** हा प्रकार सर्वत्र घडतो आणि आजही घडत आहे. भारताने काही विशेष दुष्ट प्रथा जन्माला घातली असे नव्हे ...कम्युनिस्ट देशांतही संस्कृतीचा विकास होत असतो, त्या अर्थी तेथेही उघड किंवा छुप्या स्वरूपात unpaid labour अस्तित्वात असला पाहिजे आणि तेथे 'गुलामगिरीच्या बेड्या घडवल्या व वट्ट केल्या' जात असल्या पाहिजेत...' (जाड ठसा माझा)

ब्रिटिश साम्राज्यशाहीने भारताला वसाहत बनवून भारतीय इतिहासातील महत्तम क्रांती केली असा वस्तुनिष्ठ निष्कर्ष काढून मार्क्स थांबत नाही, तर त्यासाठी तिने भारताच्या केलेल्या अमानुष शोषणपीडनाचा तो जळजळीत धिःकारही करतो. त्याचा हा आक्रस्ताळेपणा आहे असे डॉ. गांगलांना म्हणायचे आहे काय? भारताचे पारतंत्र्य अपरिहार्य होते असा निष्कर्ष काढून तो थांबत नाही, तर भारताला स्वातंत्र्य कसे मिळेल याचाही तो एखाद्या देशभक्त भारतीयाप्रमाणे विचार करतो. मार्क्सची वस्तुनिष्ठ सहृदयता ही ब्राह्मणी हृदयहीनता आहे असे भासवायचा प्रयत्न डॉ. गांगल करीत आहेत!

शोषणातूनच संस्कृती विकसित होते या मार्क्सच्या विधानाने माझ्यावर हल्ला केल्यानंतर ते विधान– जेथे संस्कृती विकसित होते तेथे शोषण असलेच पाहिजे, असे उलटे करून डॉ. गांगलांनी कम्युनिस्ट देशांवर हल्ला चढवला आहे! भांडवलशाही वरकड उत्पादनाचा एवढा व असा विकास करते की, ज्यामुळे समाजवादी क्रांती अटळ होते. समाजवादी क्रांतीनंतर प्रत्यक्ष वरकड उत्पादन करणारे श्रमिक व त्यांचे सरकार या वरकड उत्पादनाचा उपयोग नव्या समाजाच्या बांधणीसाठी व विकासासाठी करतात. मग संस्कृती शोषणातून निर्माण व्हायची गरज राहात नाही. नव्या समतेच्या संस्कृतीचा विकास हा केवळ संस्कृतीचा विकास अशी हातचलाखी करून डॉ. गांगल तिचीही जननी शोषण असल्याचा निष्कर्ष काढू पाहातात!

श्रमिकांनी वरकड निर्मितीसाठी खपल्याशिवाय 'समाजाच्या काही घटकांना' संस्कृतिनिर्मितीसाठी साठी वेळ मिळू शकत नाही, असे डॉ. गांगल म्हणतात. हे संस्कृतिनिर्माते घटक कोण? उघड आहे, केवळ उच्चवर्णीयजातीयवर्गीय! माकपच्या नंबुद्रिपादांनी हेच विधान ७७ साली केले होते आणि ते त्यांनी सिद्ध करावे असे मी त्यांना आव्हान दिले होते. ते त्यांनी स्वीकारले नाही. तेच आव्हान मी डॉ. गांगलांना देत आहे!

भारतात गुलामगिरीवर आधारलेला समाज नव्हता हे डॉ. गांगल स्वतः सिद्ध करीत नाहीत, तर त्यासाठी एकमेव हवाला देतात तर्कतीर्थ

लक्ष्मणशास्त्री जोशींचा. शास्त्रीजींसारख्या प्रकांड व व्युत्पन्न पंडिताला दासप्रथा कशी आढळली नाही म्हणजे ती कोणाला आढळू शकत नाही, असा मासलेवाईक युक्तिवाद डॉ. गांगल करतात. शास्त्रीजींची इतर पंडितांच्या तुलनेत अनन्यता ते 'ब्राह्मणपक्षपाती किंवा ब्राह्मण्यपक्षपाती' नसण्यात असल्याचे डॉ. गांगल सांगतात. डॉ. देवराज चानना हे शास्त्रीजींसारखेच प्रकांड व व्युत्पन्न पंडित होते, शास्त्रीजींप्रमाणेच त्यांची मार्क्सवादात गती होती आणि शास्त्रीजींच्या 'वैदिक संस्कृतीचा विकास' या जुन्या ग्रंथाच्या तुलनेत चाननांचे 'स्लेव्हरी इन एन्शंट इंडिया' हे जास्त अद्यावत प्रमाणांवर आधारलेले आहे. भारतीय दासप्रथेवरचे हे सर्वांत प्रगल्भ पुस्तक सर्वांत प्रमाणभूत म्हणून का स्वीकारू नये हे न सांगता डॉ. गांगल चाननांचीही केवळ टिंगल करतात. डॉ. गांगलांचे सर्वांत भारी प्रमाण शब्द वा आप्तवचनच दिसते, हे ते स. आ. जोगळेकरांना भलत्याच बाबतीत प्रमाण धरतात त्या वरून दिसून येते. सातवाहनांची राजवट इसवीपूर्व ३ ऱ्या शतकापासूनची आहे, दासप्रथाक समाजाचा अंत बुद्धकाळातच झालेला होता आणि सातवाहनांचे राज्य सामंतप्रथाक होते, ही ऐतिहासिक वस्तुस्थिती जोगळेकरांचे आप्तवचन उद्‌धृत करताना डॉ. गांगल लक्षात घ्यायला तयार नाहीत–

'...... गाथासप्तशतीचा सांगोपांग अभ्यास करणाऱ्या स. आ. जोगळेकरांनी 'हालसातवाहनाची गाथासप्तशती' ह्या आपल्या प्रस्तावनेत (पृ. २७९) म्हटले आहे, 'प्राचीन युरोपियन व मध्य एशियाटिक आणि मध्ययुगीन ख्रिश्चन व इस्लामी देशांच्या इतिहासात दिसते ते गुलामोचे रौद्र व करुण स्वरूप भारतात आढळत नाही' ... गाथासप्तशतीत दास हा सामाजिक किंवा आर्थिक अवस्थेचा द्योतक नाही. "तत्पर नोकर", "मालकिणीची मर्जी संपादन करण्यात कुशल" या अर्थाने तो गाथेत आला आहे.'

म्हणजे भारतीय सामंतप्रथाक जातिव्यवस्थेत गृहदासप्रथासुद्धा (household slavery) उरलेली नव्हती, असे धादांत खोटे विधान डॉ. गांगल जोगळेकरांच्या जोरावर करीत आहेत. जोगळेकरांच्या अनधिकारातील क्षेत्रामधलेही त्यांचे विवेचन सांगोपांग असल्याचे मानून त्यांचे तेथेही ते उपांग होत आहेत !

शास्त्रीजींचे जे तर्क डॉ. गांगलांनी उद्धृत केले आहेत, ते इतक्या वर्षांनंतर खुद्द शास्त्रीजींनाही मान्य होतील की नाही शंका आहे–

'... 'शूद्रसंस्था ही दाससंस्था नव्हती. नाहीतर प्राचीन भारतीय संस्कृती मृत्युमुखात सापडली असती. ज्या ज्या अतिप्राचीन संस्कृती मृत्युवश झाल्या त्या सर्वांचा पाया दाससंस्था होती... वैभवापेक्षा आत्मा श्रेष्ठ आहे' ते मूळ आहे. आत्मा म्हणजे माणूस. जीवनाचे सर्वस्व तेथून उगम पावते. गुलामगिरीची संस्था आत्म्याचे मूल्य अवमानिते, त्या मूल्याचे विसर्जन करते. म्हणून आत्मघातकी होते. भारतीय संस्कृती दीर्घकाळ टिकून राहिली याचे कारण दाससंस्था हा तिचा आधार नव्हता'...'

जातिव्यवस्थेत व तज्जन्य अस्पृश्यतेत आत्म्याचे मूल्य असल्यामुळेच त्या एवढचा दीर्घकाळ टिकल्या असा याचा अर्थ होतो ! आत्म्याच्या मूल्याचे प्रवर्तन उपनिषद्‌काळात शोषक क्षत्रियब्राह्मणांनी केले, तर आत्म्याच्या मूल्याचा अविभाज्य संबंध शोषणाशी, चातुर्वर्ण्यसमर्थनाशी कसा असतो हे चार्वाकांनी सिद्ध केले. चार्वाक हे आत्म्याचे मूल्य मानीत नसल्यामुळेच मृत्युवश झाले, तर वेदान्ती ते मानीत असल्यामुळेच अजूनही टिकून आहेत असा याचा अर्थ होतो ! भारतात आध्यात्मिक मार्क्सवादच टिकू शकतो, असे डॉ. गांगलांना सुचवायचे आहे असे दिसते !

डॉ. गांगल शास्त्रीजींना आणखी उद्धृत करून दासाची व्याख्या सुचवतात– 'शूद्र स्वतःच्या देहाचे, अर्थोत्पादक हत्यारांचे आणि भूम्यादि संपत्तीचे मालक होते.' **म्हणजे, दास तो असतो जो स्वदेहाचा, अर्थोत्पादक हत्यारांचा व भूम्यादी संपत्तीचा मालक नसतो.** शूद्राची व्याख्या ऐतरेय ब्राह्मणाने अशी दिली आहे की, तो महारासारखा केव्हाही, कोठेही व कशासाठीही पाठवला जाऊ शकतो (प्रेष्यः), त्यांची केव्हाही व कशीही उचलबांगडी केली जाऊ शकते (कामोत्थाप्यः) आणि त्याला केव्हाही व कसेही ठार मारले जाऊ शकते








( यथाकाम वध्यः ). रामायणातील शंबूक ' यथाकाम वध्य ' होता. महाभारतातील विदुर हा दास आहे; पण ती अंबिकेच्या दासीचे अपत्य असला तरी शूद्रेच्या पोटी, शूद्रयोनीत जन्माला आल्याचे व्यासांनी वारंवार म्हटले आहे ( १.१०५.३०; १०६.१; १०७.१६,१८; १०८.२५ ). यावरून हे दोन्ही शब्द त्या काळात पर्यायवाची होते हे स्पष्ट होते. दास हा अधन असतो, म्हणजे अर्थोत्पादक हत्यारांचा व भूम्यादी संपत्तीचा मालक नसतो, असे शर्मिष्ठा व कर्ण निःसंदिग्धपणे सांगतात. विधुरजातकात दास विधुर हा राजा धनंजय कौरव्याला सांगतो की, अर्य हा दासाचा ईश्वर असतो आणि तो दासाला ठोकू, जाळू वा ठार मारू शकतो. अर्यचा अर्थ वेदात केवळ स्वतंत्र असा नाही, तर दासस्वामी, म्हणजे दुसऱ्याचे स्वातंत्र्य हिरावून घेण्याच्या जोरावर स्वतंत्र राहाणारा, असा आहे ! बुद्धाने या संदर्भातच दासाची व्याख्या केलेली आहे– " पुरिसो दासो अस्स अनत्ताधीनो, पराधीनो, न येनङ्गकामो । " दास म्हणजे स्वाधीन नसलेला, पराधीन असलेला, स्वेच्छेने कोठेही जाऊ न शकणारा. बाजारात खरीदलेला तोच गुलाम असतो हा रूढ समज डोक्यातून काढून टाकल्याशिवाय दासाची यथार्थ कल्पना येऊ शकत नाही.

मग अशा दास-शूद्र व्यक्ती तत्कालीन समाजात किती प्रमाणात होत्या आणि समाजाचे उत्पादन त्यांच्यावर कितपत अवलंबून होते हा प्रश्न शिल्लक राहातो. महाभारतीय दासप्रथेचा दंडक वैश्य कर्ण सांगतो आणि तो स्वतः कुरूंच्या गणसभेचा एक महत्त्वाचा खासदार आहे, यावरून तिन्ही द्विजवर्ण दासस्वामी असल्याचे स्पष्ट होते. दास वा शूद्रवर्ण हा गुलाम होता हे वर दाखवलेच आहे. बुद्धकालीन संघगणात तर केवळ दोनच– अर्य व दास– वर्ण होते असे स्वत: बुद्ध सांगतो– " योन कम्बोजेसु अञ्ञेसु च पच्चन्तिमेसु जनपदेसु द्वेव वण्णा, अय्यो चेव दासो चेव। " वर्णधर्मानुसार उत्पादक श्रम करायची द्विजांना मनाई होती. शाक्यांची शेती त्यांचे नाग–मुंड गणदास करीत याचे त्रिपिटकातील अनेक निर्विवाद पुरावे मी माझ्या पुस्तकात उद्‌धृत केलेले आहेत. १ त्या भागाच्या शेवटच्या प्रकरणात मी मातृवंशक दासप्रथाक गुलामगिरीचे विवरण केले आहे, तर दुसऱ्या अजून अप्रसिद्ध असलेल्या भागात पितृवंशक शूद्रप्रथाक गुलामगिरीचे. ज्या समाजाचा एक सबंध वर्ण गुलाम आहे आणि तोच त्या समाजाचे उत्पादन चालवतो त्या समाजाला काय म्हणावे, हे डॉ. गांगलांनीच सुचवावे !

शास्त्रीजींचे शूद्रांबाबतचे म्हणणे बुद्धोत्तरकालीन सामंती जातिव्यवस्थाक समाजातील शूद्र बनिया, कुणबी व कारागीर जातींनाच लागू पडते. पण, याही समाजात अतिशूद्र जातिजमाती अधनच राहातात.

* * *

वर्ण ही संस्था वर्गसंस्थेहून वेगळी शोषणशासनाची संस्था असल्याची वस्तुस्थिती मान्य केल्यानंतर वर्णाचा उगम वर्गापेक्षा वेगळा असला पाहिजे हेही मान्य करावे लागते. वर्गाचा उगम जर प्राथमिक साम्यवादी गणसमाजाच्या विघटनातून होत असेल, तर वर्णाचा उगम यापेक्षा वेगळ्या समाजातून होत असला पाहिजे हे उघड आहे. म्हणून, माझ्यापुढे सर्वांत महत्त्वाचा पहिला प्रश्न हा होता की, प्राचीन भारतात स्त्रीसत्ता होती की नव्हती ?

भारतात स्त्रीसत्ता नसेल, तर गुर्डानवर्णित खासींमध्ये व पद्मनाभ मेननवर्णित केरळात ती कशी होती ? केरळचा माग तर थेट महाभारतापर्यंत जातो. स्त्रीराज्य हा शब्द महाभारतात आल्याचे डॉ. गांगलांना मान्य आहे. वैराज्य शब्दाचा अर्थ स्त्रीराज्य असा मी जो व्युत्पादला आहे त्याचे खंडन त्यांनी केलेले नाही. वैराज्य शब्द जिच्यावरून बनला ती विराट् अथर्ववेदात सभा व समिति या गणशासनसंस्थांची निर्मिती करताना दाखवली आहे. स्त्रीसत्तेचे मूळ निर्ऋतीत असल्यामुळेच मला तिच्यापासून चर्चेचा प्रारंभ करावा लागला.

अंबपाली व अंबवन या शब्दांचा मी दिलेला अर्थ डॉ. गांगलांनी नाकारलेला नाही. अंब म्हणजे भूमाता व वन म्हणजे तिची वाडी (sacred grove ). हा अर्थ कालिंगबोधि जातकातील

अनुक्रमणिका

'पथवियायं मण्डो' (भूमातेचा मंडप) या संस्थेवरून सिद्ध होतो. अंबची पाली म्हणजे पुजारीण हा सरळ अर्थ आहे. वज्जि तिला 'अंबका' म्हणजे आई म्हणतात. आता प्रश्न असा आहे की, अंबपालीला गणिकेच्या रूढ अर्थाप्रमाणे उत्तमा वेश्या मानायचे की नाही? दुसरी प्रसिद्ध गणिका मृच्छकटिकातील वसंतसेना आहे. पण, तिचे एखादे अंबवन मालकीचे असल्याचे, तिच्यावर उज्जयिनीची भरभराट अवलंबून असल्याचे आणि तिला उज्जयिनीवासी हे आई म्हणत असल्याचे अजिबात दिसत नाही. त्यांच्या दृष्टीने ती पूर्ण वेश्या आहे.

विट–

"तरुणजन–सहायश् चिन्त्यतां वेश–वासो,
विगणाय गणिका त्वं मार्गजाता लता इव।
वहसि हि धन–हार्यं पण्य–भूतं शरीरं,
समम् उपचर, भद्रे, सुप्रियं च अप्रियम् च॥

वाप्यां स्नाति विचक्षणो द्विजवरो मूर्खोऽपि वर्णाधमः,
ब्रह्म–क्षत्र–विशस् तरन्ति च यया नावा तथेव इतरे,
त्वं वापी इव, लता इव, नौर् इव जनं वेश्या असि,
सर्वं भज॥"– मृच्छकटिक, अंक १.

गणिका या संस्थेचे बुद्धकाल (इसवी पूर्व ६००) ते शूद्रककाल (इसवी १००) पर्यंत जर एवढे अधःपतन झालेले आहे, तर बुद्धपूर्व काळात या संस्थेचे रूप निश्चितच जास्त उन्नत असले पाहिजे. मग, मी गणिका शब्दाची गणी व संघी या शब्दांच्या आधारे मुळात स्त्रीराज्याची राणी अशी व्युत्पत्ती दिली.

खंडहरांवरून मूळ भव्य वास्तू आर्किटेक्टने पुनर्रचित करावी, त्याप्रमाणे प्राचीन भारतीय स्त्रीच्या अधःपतनाच्या सापडलेल्या पायऱ्यांवरून लुप्त ऊर्ध्व-सोपानाचीही पुनर्रचना करता येते, केली पाहिजे. कुलटा या संस्थेची व निर्ऋति या स्त्रीची मला अशीच पुनर्रचना करावी लागली. पण, डॉ. गांगलांना प्राचीन भारतीय पुरुषाचे पराधीनत्व जसे मंजूर नाही, तसे प्राचीन भारतीय स्त्रीचे एके काळचे स्वाधीनत्वही मंजूर नाही!

सरमा म्हणजे नदीमाता हे व्युत्पादन म्हणूनच डॉ. गांगलांना कबूल नाही. ती देवशुनी, म्हणजे देवांची पोलिसकुत्री होती, असेच ते म्हणतात. ही कुत्री इंद्रदूती वा देवांची अम्बॅसॅडर बनून अनार्य पणींशी देवभाषेत वाटाघाटी करते, हेही त्यांना मंजूर आहे! ती मानवी असेल तर पुरुषसत्ताक इंद्राने पुरुषदूताऐवजी स्त्रीदूतीची योजना का केली? याचा अपरिहार्य अर्थ हा की, पणींना स्त्रिया आर्यांपेक्षा जास्त पूज्य होत्या!

सरमेचा देवशुनी हा जणूकाय एकमेव अर्थ आहे असे डॉ. गांगल भासवतात. सरमा ही दुर्गा, उर्वशी व यमी यांच्याप्रमाणे वाक् या अंतराळस्थ देवतेचे एक रूप आहे, असे बृहद्देवता (२.७७) सांगते (पहा निघण्टु, ५.५.१७). म्हणजे, देवशुनी बनण्याअगोदर सरमेचेही स्थान उन्नत होते!

समाजशास्त्रातील नव्या संशोधनातून स्त्रीसत्ता नावाचा समाज जगात कोठेही अस्तित्वात नव्हता आणि खासी व केरळसारखे अपवाद सोडले तर कोणतेही समाज स्त्रीसत्तेतून गुजरलेले नाहीत असे सिद्ध झाल्याचा युक्तिवाद डॉ. गेल ऑमव्हेट व डॉ. प्रदीप कुमार बोस करीत आहेत. नेमका तो नाही, तरी तसाच युक्तिवाद डॉ. गांगल करीत आहेत. प्रत्येक प्राचीन समाज अटळपणे स्त्रीसत्तेतून गेलेला आहे असे माझे प्रतिपादन मुळीच नाही. **पशुपालनाआधी ज्या समाजांनी शेती साध्य केली तेच समाज स्त्रीसत्तेतून गेले, असे माझे जॉर्ज थॉमसनप्रमाणे प्रतिपादन आहे.** मध्य आशियात केवळ कृषिप्रधान अरबच स्त्रीसत्तेतून गेले, वाळवंटातले बिदून अरब नाहीत. त्याचप्रमाणे प्राचीन भारतात आर्यपूर्व कृषक समाजच स्त्रीसत्ताक बनले, पशुपालक आर्य नाहीत. समाजढाचा मूलतः उत्पादन-साधनांनी बनत व नियमित होत असतो. ऑस्ट्रेलिया व आफ्रिकेत काय, भारतातही अनेक जमाती अन्नचयक (food–gatherers) व म्हणून टोटेमिस्टिक राहिलेल्या आहेत. भारतात शोषणपूर्व विविध अवस्थांत असलेल्या अनेक आदिवासी जमातींचा अभ्यास होऊन नवनवे निष्कर्ष निघत आहेत हे खरे; पण त्यामुळे माझ्या निष्कर्षांना काहीच बाध येत नाही. कारण तेही प्राचीन भारतातल्या विशिष्ट समाजांच्या अभ्यासावरच आधारलेले आहेत! उदा., महाभारतकालीन अंगांसारख्या पूर्वभारतातील गणराज्यात पितृसत्ताक दासप्रथा होती हे जसे शल्याच्या उद्गारांवरून (८.४५.४०) सिद्ध होते, त्याचप्रमाणे पंजाब-

मधील वाह्लीकांसारख्या जनपदांत मातृवंशक दास-प्रथा होती हे कर्णाच्या दोषारोपांवरून सिद्ध होते— "तस्मात् तेषां भागहरा भागिनेया न सूनवः"॥ ८.४५.१३. वाजसनेयी वंशातले ऋषी मातृनामक का, पितृनामक का नाहीत, याचे उत्तर पितृसत्ताक शंकराचार्यांनी दिले आहे की, स्त्री-प्राधान्यामुळे गुणवान पुत्र निपजतात. याचा अर्थ असा होतो की, मातृनामकता तिरस्करणीय असते (गोत्रस्त्रियाः कुत्सते ण च ॥ ४.१.१४७) हा पाणिनीचा नियम स्त्रीप्राधान्योत्तर पुरुषसत्ताक समाजांचा आहे. मग, या स्त्रीप्रधान वा मातृवंशक (matrilinear) समाजांचे पूर्वजसमाज स्त्रीसत्ताक असू शकत होते काय? या अनुमानात्मक प्रश्नालाच डॉ. गांगलांचा विरोध आहे. आत्म्यासारख्या पारलौकिक गोष्टी सिद्ध करायला अनुमानप्रमाण वापरायची डॉ. गांगलांसारख्यांची सदैव तयार असते; पण, स्त्रीसत्ता, दासप्रथा यांसारख्या लौकिक गोष्टी अनुमानप्रमाणाने सिद्ध करायला मात्र त्यांचा सदैव विरोध असतो.

माझे मूलभूत प्रतिपादनच हे आहे की, अभिजात गण स्त्रीसत्तेतूनच बनतो. स्त्रीसत्तेतून न गेलेल्या विदून अरब गणामध्ये ज्ञाति (phratry) नावाचा घटक नव्हता असे मी दाखवलेले आहे. बिदूनांमध्ये राजपद नव्हते असे असगरअली इंजीनिअर सांगतात. वैदिक साहित्य सांगते की, देवांमध्ये (आर्य) राजपद नव्हते; ते त्यांनी असुरांकडून (अनार्य) घेतले. हे साहित्य असेही सांगते की, यव सोडला तर बाकी सर्व धान्ये असुरांनी शोधली. वर्णव्यवस्था आर्यांनी आणली नसून ती आर्यपूर्व सिंधु संस्कृतीत होती, असे कोसंबींनी दाखवले आहे. त्यामुळे गणाचे नाव त्याच्या क्षत्रिय-वर्णाच्या नावावरून पडते असा उपदेश करणारा— जनपदशब्दात् क्षत्रियाद् अञ् ॥ ४.१.१६८॥ हा पाणिनीय व्याकरणाचा नियम आर्यांनी नाही, अनार्यांनी बनवला, हे उघड आहे. क्षत्रिय हा शब्द मूळ वर्णवाचक नसून तो अपत्यवाचक आहे. मूळ वर्णवाचक शब्द आहे क्षत्र. क्षत्र म्हणजे स्त्रीसत्ताक गणाचा अर्धा स्त्रीवर्ग. पार्शवांच्या गणाचे नाव पर्शू नावाच्या स्त्रीहून आणि यौधेयांच्या गणाचे नाव युधा नावाच्या स्त्रीहून कसे पडले हे मी 'डॉ. मेहेंदळेंचे निर्ऋतिविरोधी व्याकरणयुद्ध' या सत्यशोधक मार्क्सवादी (नोव्हें. ८३) मधील लेखात दाखवले आहे. डब्ल्यू. रॉबर्टसन स्मिथनी त्यांच्या 'रिलिजन ऑफ द सेमाइट्स' या ग्रंथात सेमिटिक गणांची नावे मुळात स्त्रियांवरून कशी पडली हे दाखवले आहे. गणाची जननी स्त्री असते, या खासींमधील वाक्प्रचाराचा उल्लेख गुर्डान व इरावती कर्वे या दोघांनी केलेला आहे. केरळवाचक प्राचीन चेर या शब्दाचा अर्थच भूमाता होतो. खुद्द राष्ट्र हा शब्द राट् वा राष्ट्रीवरून बनलेला आहे! या व इतर पुराव्यांवरून अशा प्रसिद्ध प्राचीन भारतीय गणांचा उगम स्त्रीसत्तेतून झाला हे सिद्ध होते.

कोणतीही वस्तू परस्परविरोधांची एकजूट असते ही वस्तुस्थिती नित्यतावादी (metaphysical) डॉ. गांगलांना अर्थातच मान्य असू शकत नाही. प्राचीन समाजांत स्त्री ही पुरुषांशी उन्मुक्त संभोगासाठी व नियतकालिक सहजीवनासाठी स्वतंत्र होती ही कल्पनासुद्धा त्यांना सहन होत नाही. पुरुषसत्तेत पुरुष हा हजारो वर्षांपासून स्त्रियांशी उन्मुक्त संभोग करायला स्वतंत्र आहे ही वस्तुस्थिती मात्र त्यांना स्वाभाविक वाटते! निर्ऋति ही तिच्या भूदेवीअवस्थेतही उन्मुक्त समागमी होती या निरुक्ताच्या व्युत्पादनाला म्हणूनच डॉ. मेहेंदळेंनी कडाडून विरोध केला. उर्वशीचीही व्युत्पत्ती निरुक्ताने उन्मुक्त समागमी अशी दिली आहे. जगभरच्या मातृदेवतांप्रमाणे— ज्या मुळात त्यांच्या स्त्रीराज्यांच्या राण्या होत्या— भारतीय मातृदेवताही पुरुषबहुल होत्या आणि तरीही कुमारी होत्या या विरोधांच्या एकजुटीचा अंतर्हित अर्थ पुरुषी नीतिमत्तेच्या दृष्टिकोनातून सापडूच शकणार नाही. धर्मसूत्रकार बौधायन सांगतो की, स्त्री ही अग्नी व पाण्याप्रमाणे सदाशुद्ध असते; कारण तिची संभोगाशुद्धता दर मासिक पाळीला धुतली जात असते. सूर्य कुंतीला सांगतो की, स्त्री ही दर प्रसूतीतून परत कुमारी बनते. याचे कारण केवळ नीतिमत्तेत न शोधता भौतिकतेत शोधले पाहिजे. प्राचीन कृषिप्रधान समाजात स्त्रीचे—तिच्या प्रसवधर्मामुळे—भूमातेशी सारूप्य केले गेले होते— कृषि-उत्पादनाच्या गरजेसाठी. भूमाता जशी दर पीक-

प्रसवानंतर कुमारी होते, तशी स्त्री दर अपत्य-प्रसवानंतर कुमारी होते.

उर्वशी-पुरूरवा या सूक्ताच्या ५ व्या ऋचेचा अर्थ कोसंबींनी सर्वोत्कृष्ट दिलेला आहे या माझ्या विधानाचा अर्थ डॉ. गांगलांनी सापेक्षपणे न घेता आत्यंतिकपणे घेतला आहे. कोसंबींनी दिलेला अर्थ इतर वैदिक पंडितांनी दिलेल्या अर्थांच्या तुलनेत सर्वोत्कृष्ट असल्याचे मला अभिप्रेत आहे, हे कोणीही सुबुद्ध माणूस समजू शकतो. परंतु, भारतीय वादविवादशास्त्राने अवैध ठरवलेल्या अर्थविपर्यासादी क्लृप्त्यांचा उपयोग करून बाजी मारून न्यायचे डॉ. गांगलांनी ठरवलेले आहे. "राजा मे, वीर, तन्वस् तद् आसीः ।।" या उपऋचेचा कोसंबींनी असा अर्थ दिलेला आहे– "...O hero, then wert thou king of my body." हा चुकीचा अर्थ त्यांनी लावायचे कारण त्यांचे पांडित्य कमी पडले असे नाही, तर त्यांचा पारंपरिक मार्क्सवादी दृष्टिकोन –जो मातृअधिकारयुक्त प्राथमिक साम्यवाद मानतो पण स्त्रीसत्ता मानीत नाही– वास्तविक अर्थाला गवसणी घालू शकला नाही. कोसंबींचा अर्थ डॉ. गांगलांना मान्य असेल, तर उर्वशीने पुरूरव्याचा पुरुषमेध केला हा अर्थही त्यांना मान्य करावा लागेल. गणाची राणी स्वपतीला बळी देण्याइतकी स्वतंत्र व शास्ती होती हेही मग त्यांना मान्य करावे लागेल!

डॉ. गांगलांच्या अर्थविपर्यासाच्या क्लृप्तीचा आणखी एक नमुना पाहा–

'दक्षिणपंचालांच्या राजधानीत झालेल्या द्रौपदीच्या स्वयंवरोत्सवाला' (पृ. २४९) वगैरेंमधून महाभारतावर खूपच चांगला प्रकाश टाकला आहे. इरावती कर्व्यांना किंवा दुर्गा भागवतांना किंवा इतर कुणालाही न जाणवलेला हा महाभारताचा अर्थ फक्त शरद पाटलांना जाणवला. द्रौपदीचे स्वयंवर मुदलातच बहुपतिक होते. पण कर्णाने जिंकला असता तर? त्याला बिचाऱ्याला बरेचसे भाऊ (असल्याचे माहीत) नव्हते! स्वयंवर बहुपतिक असल्याचे द्रौपदीला माहीत नव्हते, द्रौपदीच्या नातेवाईकांना माहीत नव्हते, स्वयंवराला आलेल्या कुणा-माहीत नव्हते, कुंतीने 'भिक्षा सर्वांत वाटून घ्या' म्हणेपर्यंत अर्जुनालाही माहीत नव्हते, ते फक्त शरद पाटलांच्या सूक्ष्म अन्वेषणदृष्टीला दिसले!......'
(जाड ठसा डॉ. गांगलांचा)

द्रौपदीची बहुपतिकता ही कोणताही सामाजिक संदर्भ नसलेली अपघातात्मक घटना होती, कुंतीने गफलतीने आज्ञा दिली नसती तर ही 'अनिष्ट' घटना घडलीच नसती, अशी इतर सनातन्यांप्रमाणे डॉ. गांगलांचीही धारणा आहे. पांडव एवढे कर्मठ मातृभक्त होते, तर त्यांनी तिच्या आज्ञेप्रमाणे एकदम युद्ध सुरू न करता पाच गावांची भीक का मागितली? म्हणजे मातेची आज्ञा त्यांच्या 'धोरणात' बसत असली तरच ते ती मानत होते. मातृआज्ञेची भाकडकथा मानायची असेल, तर द्रौपदीची बहुपतिकता पूर्वजन्मी महादेवाकडे मागितलेल्या चुकीच्या वरामुळे झाली, याही भाकडकथेवर विश्वास ठेवावा लागेल. मग, पंचाल व पांडव नसले, तरी महादेव बहुपतिक होता असे मानावे लागेल!

गणधनाचे 'सहभोजन' करायचा समय–करार पांडवांनी स्वयंवराकडे येतानाच घेतलेला होता, असे युधिष्ठिर द्रुपदाला सांगतो–

"एष नः समयो राजन् रत्नस्य सहभोजनम् ।
न च तं हातुम् इच्छामः समयं राजसत्तम ।।"
(१. १९४. २५).

हा बहुपतिकतेचा समय ते व्यक्तिगत बायका करून आणल्यानंतरही पाळतात. एवढ्यावरही ते थांबत नाही. इरावती कर्वेंचा अधिकार डॉ. गांगलांना निरपवादपणे मान्य असल्यामुळे 'युगान्त' मधील त्यांचे निरीक्षण उद्धृत करतो. उद्योगपर्वात कर्णाला पांडव पक्षाकडे आणण्यासाठी कृष्ण त्याला सांगतो– "....पांडवांतला सहावा म्हणून द्रौपदी तुझी होईल [षष्ठे च त्वां तथा काले द्रौपद्युपगमिष्यति ।] ......" (पा. २२०)

ज्येष्ठतम पांडव म्हणून तुला युधिष्ठिराऐवजी राजा करतो, एवढेच कृष्णाने सांगितले असते तर भागले असते. इरावती कर्व्यांच्या म्हणण्याप्रमाणे द्रौपदीला कर्णाची आसक्ती नव्हती, तर कर्णाने कृष्णाचा प्रस्ताव फेटाळून लावल्यावरून त्यालाही तिची काडीमात्र आसक्ती नव्हती हे स्पष्ट होते. कृष्ण हा प्रस्ताव केवळ प्रलोभन म्हणून करीत नसून तो एक तत्कालीन लोकाचार होता म्हणूनही करतो.

अनुक्रमणिका






कौरवांत पुरुषप्राधान्य का आणि पांडवांत स्त्रीप्राधान्य का, या महाभारताच्या काळीच्या प्रश्नाचे उत्तर सपशेल टाळण्यासाठी डॉ. गांगलांना इरावती कर्वे व दुर्गा भागवत या प्रमाणभूत वाटल्या; पण या दोघींपेक्षा श्रेष्ठ पंडित असलेले राजवाडे का प्रमाणभूत वाटले नाहीत ? या काळीच्या प्रश्नाचे वैज्ञानिक उत्तर द्यायचा प्रयत्न राजवाड्यांनी त्यांच्या 'भारतीय विवाहसंस्थेचा इतिहास' या पुस्तकात केलेला आहे–

'(२) पांडव हे तिबेटातून आले. कौरव हे काश्मीरातून आले. पांडवांत polyandry (बहुपतित्व) होती. कौरवांत polygany (बहुपत्नीत्व) होती ...' (पा. २१–२२)

मी मांडलेला एक पर्याय वा अभ्युपगम हाच माझा निष्कर्ष असल्याचे मानून डॉ. गांगल यांनी "जितं मया" अशी आरोळी ठोकली आहे–

'आता कौरव कडवे पितृसत्ताक आणि पांडव चिवट मातृसत्ताक, तरी ते एकमेकांचे चुलतभाऊ कसे, हा प्रश्न तुम्हाआम्हाला पटेल, तसा पाटलां-नाही पडला. मग ते विचारतात, "हेच जास्त संभवनीय नाही का की, पांडव हे मध्य वा दक्षिण भारताचा एक स्त्रीसत्ताक वा मातृवंशक गण होते ज्याच्याशी त्यांचे कसलेही नाते नव्हते अशा पितृसत्ताक कौरव गणाशी त्यांचा वारंवार संघर्ष आला ?" (पृ. १७०) महाभारताचा, साऱ्या परंपरेचा, इतिहासाचा कौल विरुद्ध असूनसुद्धा हेच जास्त संभवनीय, कारण ते पाटलांच्या वर्ण-वर्गजातिवादी (!) अन्वेषणपद्धतीशी सुसंगत आहे ...'

त्यांच्या दुर्दैवाने माझा निष्कर्ष पुढच्या, १७१ व्या पानावर आहे–

'पण येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की, पांडव हे तापत्य आहेत असे त्यांना चित्ररथाला सांगावे लागले. ते स्वतः पंडूचे क्षेत्रज पुत्र असल्याने त्यांच्या दृष्टीने स्त्रीसत्ताकता गतकालीन गोष्ट झालेली होती. मग त्यांनी स्त्रीसत्ताक आचार कसे स्वीकारले ? लाक्षागृहातून जीव घेऊन पळाल्यानंतर त्यांना हिडिंबा व बकासूर यांच्या स्त्रीसत्ताक वा मातृवंशक गणराज्यांचा आसरा घ्यावा लागल्याने व कौरवांचा खुनी पाठलाग होऊ नये म्हणून त्यांना स्त्रीसत्ताक आचार स्वीकारावे लागले. या कायाकल्पानंतर त्यांनी देवी द्रौपदीशी विवाह केला. या बलशाली सोयरिकीमुळे कौरवांना इंद्रप्रस्थाचे अर्धे राज्य, जे जंगल होते, देणे भाग पडले. पांडव तेथे द्रौपदीच्या नेतृत्वाखाली एक स्त्रीसत्ताक म्हणून स्थायिक झाले...'

द्रौपदी ही इंद्रप्रस्थाच्या गणराज्याची शासिका नव्हती हे सिद्ध न करता डॉ. गांगल एकूण गण-देवीच्या संकल्पनेचीच टर उडवतात–

'...द्रौपदी जर गणाची देवी आणि इन्द्रप्रस्थाच्या राज्याचा आर्थिक व शासकीय कारभार पाहणारी, तर फासे टाकून गणभूमीची वाटणी करायचे पाटील-विहित कार्य सोडून फासे टाकणाऱ्या धर्माने तिला पणाला लावावे अशी तिची अवस्था का झाली ? आणि गणदेवीला पणाला लावायला स्त्रीसत्ताक पांडवगणातला तिचा एक साधारण पती धजला तरी कसा ?'

माझ्या पुस्तकाचे उद्दिष्ट व्यक्तिजीवने चित्रित करणे हे नसून प्राचीन भारतीय समाजाचा इतिहास मांडणे हे असल्याने मी व्यक्तिजीवनातील संबंधित प्रसंगच पुराव्यासाठी घेतलेले आहेत. डॉ. गांगलांना द्रौपदीचे व्यक्तिजीवन वाचायचे असेल तर त्यांनी नवभारताच्या जुलै ७९ अंकात प्रसिद्ध झालेला माझा लेख पाहावा. इंद्रप्रस्थाचा सर्व राज्यकारभार द्रौपदी कशी चालवीत असे आणि पांडवांचे काम केवळ शस्त्रास्त्रविद्येची उपासना करणे एवढेच कसे होते हे ती वनपर्वात सत्यभामेला सांगते. त्याचे न. र. फाटककृत भाषांतर मी पा. १६८ वर दिले आहे. या श्लोकांमधील सर्वांत महत्त्वाचे खालील-प्रमाणे–

"सर्वं राज्ञः समुदयम् आयं च व्ययम् एव च ।
एकाहं वेद्मि कल्याणि पांडवानां यशस्विनी ॥ ५३ ॥
मयि सर्वं समासज्य कुटुंबं भरतर्षभः ।
उपासनरताः सर्वे घटयन्ति स्म वरानने" ॥

३. २३३. ५४ ॥

देवी शब्दाची व्युत्पत्ती गणभूमी व इतर गणधन गणात फाशांनी समानपणे वाटणे ही कशी आहे हे मी पा. १४१–१४२ वर दिले आहे. तिचे खंडन डॉ. गांगलांनी केलेले नाही. बुद्धकालीन शोषणा-धिष्ठित 'हिंदू रीपब्लिक्सचा' राज्यकारभार

शलाकांनी कसा चाले, हे काशीप्रसाद जयस्वालांनी त्यांच्या 'हिंदू पॉलिटी'त सिद्ध केले आहे. मी सिद्ध एवढेच केले आहे की, शोषणपूर्व भारतीय गणसमाजाचा कारभारही शलाकेचा पूर्वज अक्ष वा फासा व अष्टपदाचे पूर्वज अधिदेवन वा चौपट यांनी चाले. त्याचे सप्रमाण विवरण मी 'फासे व शेती' या प्रकरणात केले आहे. त्याचेही खंडन डॉ. गांगलांनी केलेले नाही. अधिदेवन व अक्ष हे प्रारंभापासूनच केवळ जुगार खेळायचेच साधन होते, या डॉ. मेहेंदळेंच्या प्रतिपादनाचा मी सप्रमाण प्रतिवाद केलेला आहे. तरीही गणधनाची वाटणी करायच्या एवढ्या प्राचीन कर्माच्या प्रवर्तनाचे श्रेय डॉ. गांगल मला देत असल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे !

एवढेच नाही, तर आजपासून ५००० वर्षांनंतरच्या 'इतिहासाचेही' श्रेय ते मला देऊ पाहातात–

'... कुलदेवतेसंबंधीचा जो युक्तिवाद पाटलांनी केला आहे तो अद्‌भुत आहे : "द्रौपदीचे एक नाव पार्वती होते. दुर्गेचे एक नाव पार्वती होते. म्हणून दुर्गा पांडवांची कुलदेवता होती" (पृ. १७१). १९६५ ते १९८३ पर्यंतच्या भारताच्या इतिहासाचे ह्या पद्धतीने विश्लेषण करणारे ५००० वर्षांनंतरचे एखादे शरद् पाटील म्हणतील, "पंतप्रधान गांधींचे एक नाव इंदिरा आहे (दुसरे प्रियदर्शिनी). लक्ष्मीचेही एक नाव इंदिरा आहे. भारत हे गणराज्य होते (यात शंका नाही)– लक्ष्मी ही अखिल भारतीयांची कुलदेवता होती. त्या काळी भारतात मातृसत्ताक पद्धती होती. पितृसत्ताकतेचे कडवे पुरस्कर्ते मोरारजी देसाई ह्यांनी १९७७ ते १९८० ह्या काळात मातृसत्ताक इंदिराजींची सत्ता बळकावून घेतली होती" ... इत्यादी, इत्यादी ...'

नवब्राह्मणी कम्युनिस्ट वा मार्क्सवादी हे गणसमाजाचे केवळ प्रिमिटिव्ह कम्यूनिझमशी सारूप्य करतात. मी शोषणपूर्व गणराज्ये व शोषणाधिष्ठित वा दासप्रथाक गणराज्ये असा भेद करतो आणि तो मी २ ऱ्या भागात स्पष्ट केला आहे. आताचे भारतीय गणराज्य हे गणसमाजाधिष्ठित नाही आणि 'इंदिरादेवी' या स्त्री असल्या तरी त्या पुरुषसत्तेचे जातिव्यवस्थाक भांडवलदारी शासन चालवीत आहेत हे ५००० वर्षांनंतरचाही माझा दायाद विसरू शकणार नाही. पण डॉ. गांगलांसारखा देवरसशिष्य राजकारणात ते आताच विसरलेला आहे. म्हणून, त्यांच्या इंदिरादेवी–एकानुवर्तित्वाच्या भाकिताचे पेटंट त्यांनी जपून ठेवावे. दुसऱ्या आणीबाणीत ते कामाला येईल !

द्रौपदीचे एक नाव पार्वती होते असे मी म्हटलेलेच नाही. मी म्हटले आहे : पार्षती. पांडवांची कुलदेवता दुर्गा नव्हती तर कोण होती याचे उत्तर डॉ. गांगलांनी दिलेले नाही. ते उत्तर कसलेच देत नाहीत, फक्त प्रश्न विचारतात, आणि तेही विपर्यस्त. ज्या परंपरेची ते आणभाक घेतात तिच्या अन्वये पांडवांची कुलदेवता अर्थातच असू शकत होती. विराटनगरीत अज्ञातवासार्थ प्रवेश करण्याआधी अज्ञातवास सुखरूप पार पडावा अशी प्रार्थना करण्यासाठी युधिष्ठिर दुर्गास्तवन करतो (४.६). यावरून ती पांडवांची कुलदेवता होती हे स्पष्ट होते. दुर्गेचे एक नाव पार्षती आहे. आता त्यांना प्रमाणभूत असणाऱ्या इरावती कर्वे 'युगान्त'मध्ये काय म्हणतात ते पाहू या–

'...द्रौपदी आणि द्रौपदीचे भाऊ मोठेपणी यज्ञातून आली. त्यांना आपल्याबद्दल काहीच वाटायचे नाही, अशा भीतीने द्रुपदाची राणी पृषती हिने अग्निदेवाची प्रार्थना केली की, 'देवा, ह्या मुलांना आपल्या खऱ्या जन्माचा विसर पडून मीच त्यांची आई आहे, असे वाटावे'; म्हणून द्रौपदीचे 'पार्षती' असेही आईवरून आणखी एक नाव आहे...' (पा. १०३)

पण, खुद्द द्रुपदाचीही बिरुदे पार्षत व पृषदात्मज होती. यावरून पंचालांच्या राजकुलाची कुलदेवता दुर्गा होती हे स्पष्ट होते. मग ती पांडवांची कुलदेवता कशी झाली ? द्रौपदीच्या बहुपतिक विवाहानंतर ती इंद्रप्रस्थाची राणी झाली. प्रत्येक पतीने ज्येष्ठताक्रमानुसार तिच्याशी एक वर्षाचा सहवास करावा असे समय-करारानुसार ठरले. या समयाचा जो भंग करील त्याने १२ वर्षे तीर्थयात्रेला जावे, असे या समयाचे एक कलम होते. अर्जुनाच्या हातून त्याचा भंग झाला. १२ वर्षांनंतर सुभद्रेला परणून तो इंद्रप्रस्थाला परतेतो द्रौपदीशासन चालू होते. खांडवदाहातून संहारित नागगणाचे किंकर दास पांडवांनी


अनुक्रमणिका

आपल्या पदरी ठेवून शोषणपूर्व स्त्रीराज्य खालसा करून ते दासप्रथाक व पुरुषसत्ताक करीतो अबाधित राहिले. या किमान १२ वर्षांच्या द्रौपदीशासनात पांडवांची कुलदेवता कोणती असू शकत होती ?

आता परशुरामाविषयी. तो जमदग्नीचा मुलगा. बोधायन श्रौतसूत्राचा प्रवराध्याय सांगतो की, जमदग्नि हा पुढील सप्तर्षींपैकी एक होता—

विश्वमित्रो जमदग्निर् भरद्वाजोऽथ गौतमः ।
अत्रिर् वसिष्ठः कश्यप इत्य् एते सप्त ऋषयः ।

कोसंबी म्हणतात की, यांत अस्सल आर्य केवळ विश्वमित्रच आहे, बाकी सर्व अनार्य, मातृवंशक (पाहा, माझे पुस्तक, पा. २०३). भार्गवसंस्कारकांनी महाभारताची संस्करणे पुरुषसत्ताक पद्धतीने करताना परशुरामावरही पितृसत्ताक संस्कार केलेला आहे हे उघड आहे. ब्राह्मणी परंपरेप्रमाणे तो कडवा पुरुषसत्ताक असता, तर स्त्रीसत्ताक केरळची संस्थापना परशुरामाने केली ही आख्यायिका केरळमाहात्म्यमध्ये ग्रथित झालीच नसती.

* * *

प्राचीन भारतीय समाजात स्त्रीपुरुषसंयोगाचे उद्दिष्ट —मग तो सामूहिक समागम असो की व्यक्तिगत देवविवाह —केवळ कामवासनापूर्ती वा अपत्यनिर्मिती नसून गण व सृष्टीचे पुनरुत्पादन करणारा द्यावापृथिवीचा पर्जन्यदायी वैश्विक देवविवाह वेळीच घडवून आणणे हेही होते. हे लक्षात घेतल्याशिवाय वीर्यशुल्का व धर्मनटी यांचा खरा अर्थ उघड होणार नाही. सांडसदृश वीर्यसंपन्न (virile) पुरुष-ब्रह्मन्च्या वीर्याने केवळ गणराज्ञीच सुपीक होते असे नाही, तर भूमाताही सुपीक होते अशी त्या समाजाची धारणा होती. म्हणून, गणराज्ञी स्वगणातील (नंतर परगणातील) सर्वांत वीर्ययौवनसंपन्न पुरुष देवविवाहासाठी निवडी आणि वीर्ययौवनाचा त्याचा भर असेपर्यंतच त्याच्याशी सहवास करी. कारण हा भर ओसरला की, गण व निसर्ग नष्ट होतात अशी त्या समाजाला भीती वाटे. अशा वीर्यबलयौवनसंपन्न पुरुषाचे वीर्य गण व निसर्गाच्या पुनरुत्पादनासाठी घेणारी या विशिष्ट अर्थाने वीर्यशुल्का व धर्मनटी ही विरुदे अनुक्रमे महाकाव्यांत व जातकात वापरण्यात आलेली आहेत.

* हा प्राचीन भारतीय समाज सजीव व निर्जीव, मानव व मानवेतर सृष्टी यांचे परात्मीकरण ( alienation ) न झालेला 'गोतावळा' होता. म्हणून या समाजाचे सर्व उद्दिष्ट गण व निसर्गाचे भौतिक व मायिक प्रक्रियांनी पुनरुत्पादन करण्यात एकवटलेले होते. स्त्रीगणार्ध व पुरुषगणार्ध यांचा आणि या गणार्धांचे व्यक्तिगत प्रतिनिधी यांचा संयोग विश्वार्धांच्या संयोगाला कारणीभूत होतो या धारणेतून भारतीय स्त्रीसत्ताक गणसमाजात आद्य वर्णसंस्थेचा जन्म झाला ( पाहा पा. २२० ). *

वर्णसंस्थेचा वर्गसंस्थेहून पूर्णपणे वेगळा असलेला हा उगम शोधून अतिरिक्त उत्पादनातून मातृवंशक दासप्रथेपर्यंत तिने केलेल्या वाटचालीचा मागोवा हे पुस्तक घेते. या पुस्तकाचा प्रसिद्धयभिमुख २ रा भाग मातृवंशक दासप्रथेतून पितृवंशक शूद्रप्रथाक गुलामगिरीत झालेल्या संक्रमणाचे सूत्र धरून वर्णसंस्थेचा वर्णान्त व जात्योदयाच्या समाजक्रांतीपर्यंत झालेला प्रवास दिग्दर्शित करतो.

जात्यन्ताच्या महाक्रांतीचे नेतृत्व करू इच्छिणारे व शकणारे अतिशूद्र हे अर्धे पुस्तकही उत्तरोत्तर थोर आशेने वाचत आहेत. डॉ. गांगलांची म्हणूनच घोर निराशा झालेली दिसते ! एंगल्सच्या समर्पक वचनाने म्हणूनच मी लेखाची सुरुवात केली आहे !

○ ○ ○

## चुकीची दुरुस्ती

| पृष्ठ | स्तंभ | ओळ | अयोग्य | योग्य |
|---|---|---|---|---|
| १ | १ | ९ | निसर्गातील | निसर्गातीत |
| १ | १ | ११ | व्यापक | परतत्त्वप्रधान विचारसरणी व व्यापक |
| १ | २ | १७ | धर्मकांड | कर्मकांड |
| १ | २ | २१ | राज्मे | राज्ये |

— संपादक









अनुक्रमणिका

## साभार पोच

* **महाराष्ट्रातील वैज्ञानिक क्रांती**– लेखक व प्रकाशक मुरलीधर मनोहर जावडेकर, प्राचार्य, स. का. पाटील सिंधुदुर्ग महाविद्यालय आणि ज्युनिअर कॉलेज, मालवण ४१६६०६ ( जि. सिंधुदुर्ग); १९८२; पृ. २६६; किं. १५० रुपये.

* **तपस्या** (कादंबरी)– सुमती क्षेत्रमाडे; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर कॉलनी, पुणे– ४११ ०३०; १९८४; पृ. ५०६; किं. ६० रुपये.

* **गोदातटीचे कैलासलेणे**– (कै. नरहर कुरुंदकर स्मृतिग्रंथ)– मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश, इसामिया बाजार, हैदराबाद–५०००२७; १९८३; पृ. ५७२; किं. १०० रुपये

* **असा दिवस उजाडतो, असा दिवस मावळतो** (लेखसंग्रह)– संपादक उमाकांत ठोमरे; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार, पुणे ३०; १९८४; पृ. १२७; किं. रु. २७.५०

* **मंडल अहवालाची चिकित्सा**– भाई म. शं. ढोले, विचार प्रबोधिनी प्रकाशन, लोखंडे बिल्डिंग, मेनरोड, सांगोला– ४१३ ३०७ (जि. सोलापूर); १९८४; पृ. ४४; किं. ५ रुपये.

* **वाघ आणि माणूस**– रमेश देसाई; ग्रंथाली प्रकाशन, ३४।९०२, नेहरूनगर, कुर्ला (पूर्व) मुंबई ४०० ०२४; १९८३; पृ. २३०; किं. ४० रुपये.

* **मानवाचा पुत्र येशू**– भाऊ धर्माधिकारी; ग्रंथाली प्रकाशन, ३४।९०२, नेहरूनगर, कुर्ला (पूर्व), मुंबई ४०० ०२४; १९८३; पृ. ८२; किं. १० रुपये.

* **गुरुचरित्र** (कवितासंग्रह)– गुरुनाथ सामंत; मौज प्रकाशन गृह, मुंबई ४०० ००४; १९८४; पृ. ११६; किं. १८ रुपये.

* **सांध्यमित्रा** (कवितासंग्रह) – सौ. श्रद्धा पराते; अंबिका प्रकाशन, द्वारा : एम. बी. पराते, आगाराम देवी परिसर, गणेशपेठ, नागपूर– १८; १९८३; पृ. ८८; किं. १६ रुपये.

* **त्रिसुपर्ण** (कथासंग्रह)– प्रभाकर पाध्ये; मौज प्रकाशन गृह, मुंबई ४०० ००४; १९८३; पृ. ९४; किं. रु. २१.५०

* **एन्कीच्या राज्यात** (कादंबरी)– विलास सारंग; मौज प्रकाशन गृह, मुंबई ४०० ००४; १९८३, पृ. १८३; किं. ३५ रुपये.

* **सूर्यबिंबाचा शोध**– (स्वातंत्र्यवीर सावरकर गौरविका)– संपा. विलास खोले; शोध प्रकाशन, ३४९ सोमवार पेठ, पुणे ४११ ०११; १९८४; पृ. १४२.

* **देवांसी जिवे मारिले** (विज्ञान-कादंबरी)– लक्ष्मण लोंढे / चिंतामणी देशमुख; ग्रंथाली प्रकाशन, ३४।९०२ नेहरूनगर, कुर्ला (पूर्व), मुंबई २४; १९८३; पृ. १८७; किं. २४ रुपये.

* **क्रान्तीनंतरचा क्युबा**– माधव गडकरी; श्रीविद्या प्रकाशन पुणे– ३०; १९८४; पृ. १०८; किं. २५ रुपये.

* **शालजोडी** (लेखसंग्रह)– मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगाव, मुंबई ४००००४; १९८३; पृ. १८०; किं. ४५ रु.

* **माळझरे** (कवितासंग्रह)– बा. ह. कल्याणकर; नवता प्रकाशन, २८ स्वातंत्र्यसैनिक कॉलनी, औरंगाबाद; १९८०; पृ. ३२; किं. १० रुपये.

* **Renaissance in Western India** : Karmaweer V. P. Shinde (1873–1944)– Mrs. Shivaprabha Ghugare; Himalayan Publishing House, Bombay 400 004.

⊙ ⊙ ⊙









## सार-संकलन

### असूर्या नाम ते लोकाः

#### मध्ययुगाचा पुनर्जन्म

जगात काय काय घडत असते ? फेब्रुवारी १९८४ मध्ये कुठेकुठे घडलेल्या काही गोष्टी नमुन्यासाठी पुढे नमूद केल्या आहेत.

खार्टुम, सुदान या शहरात तीन हजार लोकांच्या जमावापुढे दोन कैद्यांचे उजवे हात तोडण्यात आले. कैदी २१ आणि २२ वर्षांचे होते. त्यांच्यावर चोरीचा गुन्हा शाबीत झाला होता. या गुन्ह्यासाठी आता पारंपरिक इस्लामी कायद्याला अनुसरून सुदानमध्ये हातपाय तोडण्याची शिक्षा देण्यात येते.

८ सप्टेंबर १९८३ पासून सुदानमध्ये पूर्वी प्रचलित असलेल्या आधुनिक फौजदारी कायद्याऐवजी (पीनल कोड) इस्लामी शरियावर आधारलेला कायदा लागू करण्यात आला आहे. या नवीन कायद्याप्रमाणे चोरीसाठी उजवा हात तोडण्याची शिक्षा आहे. सतत चोरी करणे आणि दरोडा घालणे यासाठी दोन्ही हात तोडण्यात येतात. दारू पिणे किंवा अविवाहित माणसाने केलेला व्यभिचार या गुन्ह्यांसाठी फटक्यांची शिक्षा देण्यात येते. विवाहित माणसाने केलेल्या व्यभिचारासाठी दगडांनी ठेचून ठार मारण्यात येते. खुनासाठी फाशीची शिक्षा आहे; पण खून झालेल्या माणसाच्या कुटुंबाने जर नुकसानभरपाई स्वीकारली तर गुन्हेगाराला सोडून देण्यात येते. (ज्या भारतीय मुसलमानांचा समान नागरी कायद्याला विरोध आहे त्यांनी आपल्याला हा पवित्र कायदा लागू करावा अशी मागणी केल्याचे ऐकिवात नाही.) या सर्व शिक्षा सार्वजनिक रीतीने देण्यात येतात.

आपल्याला वाटेल तितक्या ह्या शिक्षा अघोरी नाहीत. कारण त्या देताना आधुनिक विज्ञानाचे साहाय्य घेण्यात येते. नोव्हेंबर १९८३ मध्ये सुदानचे एक ज्येष्ठ न्यायाधीश एक शिष्टमंडळ घेऊन सौदी अरेबियात गेले होते. शरियाधिष्ठित कायदा लागू करताना कोणती पद्धती (प्रोसिजर) अनुसरणे योग्य असते आणि हातपाय तोडताना कोणती वैद्यकीय कौशल्ये आवश्यक असतात याची माहिती करून घेणे हा हे शिष्टमंडळ नेण्यामागचा हेतू होता. या विषयातील तज्ज्ञ जर जगात कुठे असतील तर अर्थात सौदी अरेबियात असतील. फारसे रक्त वाया जाऊ न देता किंवा हाडाचे फारसे नुकसान न करता कोपरापासून हात तोडणे ही साधी गोष्ट नाही. हे कौशल्याचे काम आहे.

'सुना' ह्या सरकारी वार्तायंत्रणेने या प्रसंगाचे केलेले वर्णन पुढे दिले आहे. तो पाहण्यासाठी फक्त मुसलमानांना प्रवेश होता आणि छायाचित्रे घेण्याची बंदी होती.

"दोघा कैद्यांना खास बनविलेल्या खुर्च्यांवर बसविण्यात आले होते. खुर्च्यांचे पाय कॉंक्रीटमध्ये रोवून जमिनीत घट्ट रुतलेले असतील अशी व्यवस्था करण्यात आली होती. कैद्यांचे उजवे पंजे मनगटापासून कापसाने झाकलेले होते. दोघा पुरुष परिचारकांनी त्यांच्या उजव्या हातावर एक पट्टी बांधून एका वैद्यकीय उपकरणाची दोरी तिला अडकविली होती. पंजा तोडण्यात आल्यावर रक्तप्रवाह अडविण्यासाठी हे उपकरण वापरण्यात येते असे म्हणतात. पुरुष परिचारकांनी कैद्यांचा रक्तदाब मापल्यानंतर त्यांचे पाय कातडी पट्ट्यांनी बांधण्यात आले आणि त्यांचे डोळे पट्ट्याने झाकण्यात आले. हे सर्व होत असताना कैदी पोलिसांशी गप्पा मारीत होते. मधून मधून ते आपला उजवा पंजा चाचपत होते. पण ते बधीर करण्यात आले होते.

दहा वाजता दोघे सैनिक ऑपरेशनच्या वेळी घालतात तशी ॲप्रन घालून आपापल्या कैद्याकडे गेले. त्यांच्या हातात अतिशय धारदार आणि निर्जंतू बनविलेले सुरे होते. त्यांनी बोटांनी पंजा पकडला आणि तो अतिशय कौशल्याने आणि चपळाईने तोडून टाकला. हे कृत्य मिनिटभरात झाले आणि कुणीही कैदी हालला नाही, किंवा त्यांनी काही आवाज

काढला नाही. त्यांना इंजेक्शन देऊन त्यांचे हात बधीर करण्यात आले होते आणि 'सीडेटिव्ह' ही खूप प्रमाणात देऊन गुंगी आणण्यात आली होती. म्हणून बहुधा त्यांना वेदना जाणवली नाही.

पंजे तोडले जात असताना प्रेक्षकांनी पसंतीच्या टाळ्या वाजविल्या. तोडलेले पंजे वर उचलून घेऊन प्रेक्षकांना दाखविण्यात आले.

स्ट्रेचर्स तयार होती. एक कैदी त्यांच्याकडे स्वतःच चालत गेला. दुसऱ्याला उचलून न्यावे लागले. स्ट्रेचरवरून त्यांना अॅम्ब्युलन्स गाडीकडे नेण्यात आले. तेथे त्यांच्यावर प्रथमोपचार करून पुढील उपचारासाठी त्यांची इस्पितळाकडे रवानगी करण्यात आली."

प्रेक्षकांना ही सर्व कारवाई दाखविण्यात येण्याचे कारण असे, की इस्लामी पारंपरिक शरिया या कायद्यानुसार ह्या शिक्षा सार्वजनिक रीतीने देण्यात याव्या लागतात. 'राष्ट्रीय राजधानी न्यायव्यवस्थे'चे अध्यक्ष यांनी या बाबतीत असे विधान केले, की जरी पंजे तोडण्याची शिक्षा देण्याचा हा आमचा पहिलाच अनुभव होता तरी एकंदर कारवाई सुरळीतपणे पार पाडण्यात आली. ह्याचे एक कारण म्हणजे अवयव बधीर करणाऱ्या आणि गुंगी आणणाऱ्या औषधांचा करण्यात आलेला वापर.

आधुनिक विज्ञान आणि इस्लामी प्राचीन परंपरा यांचा सुरेख समन्वय या शिक्षेच्या प्रसंगी साधण्यात आला असे म्हणणे योग्य ठरेल.

## भाबड्यांसाठी

अनेक भाबड्या लोकांची अशी समजूत आहे, की सोव्हिएट युनियन आणि त्याच्या गोतावळ्यात येणारे देश यांचा जागतिक शांततेला पाठिंबा आहे, निःशस्त्रीकरण घडवून आणण्यासाठी ते सतत धडपडत असतात आणि विशेषतः अण्वस्त्रे कमी करण्याची, शक्यतर त्यांचे निर्मूलन करण्याची त्यांना तळमळ लागून राहिलेली असते. त्यांनी विचार करावा अशी बातमी अशी, की १२ डिसेंबर रोजी बर्लिन (जर्मन डेमॉक्रॅटिक रिपब्लिक) येथे शांतता-मोर्च्यात सहभागी असलेल्या पाच जणांची धरपकड करण्यात आली. त्यांतील दोघांना अटकेत ठेवण्यात आले आहे. फौजदारी कायद्याच्या ९९ ह्या कलमाखाली "बाहेरच्यांना माहिती पुरवून राज्यद्रोह केल्याचा" आरोप त्यांच्यावर ठेवण्यात आला आहे. ह्या कलमाने परकीय संघटना किंवा त्यांचे सहायक यांना राज्याच्या हितसंबंधांना बाधा आणील अशी माहिती पुरविण्याला बंदी करण्यात आली आहे. हे कलम गुप्त नसलेल्या माहितीविषयी आहे, असे त्याच्यात स्पष्टपणे म्हटले आहे. पुरविलेली माहिती बिनचूक असली तरी त्यामुळे गुन्ह्यात काही फरक पडत नाही. प्रस्तुत प्रकरणाशी ज्या माहितीचा संबंध आहे ती जर्मन डेमॉक्रॅटिक रिपब्लिक या राज्यातील लष्करीकरणाविषयीची माहिती होती. आण्विक निःशस्त्रीकरणाविषयीच्या एका पुस्तकात अंतर्भूत करण्यासाठी ती न्यूझीलंडच्या एका नागरिकाला पुरविण्यात आली होती. "मानवी हक्कांविषयीच्या सार्वत्रिक जाहीरनाम्यात" (युनिव्हर्सल डिक्लरेशन ऑफ् ह्यूमन राइट्स) राज्यांमधील सीमांची दखल न घेतली जाता सर्व प्रकारची माहिती आणि कल्पना यांचा शोध घेण्याचा, स्वीकार करण्याचा आणि त्यांचे प्रदान करण्याचा हक्क मान्य करण्यात आला आहे. त्याच्याशी वरील कलम विसंगत आहे. शांतता मोहीम किंवा निःशस्त्रीकरण मोहीम या 'भांडवलशाही' देशांसाठी आहेत, त्या साम्यवादी देशांत चालविणे म्हणजे शांततेत विघ्न आणण्यासारखे असते, साम्यवादी देशाने केलेले युद्ध हा शांततेचाच प्रकार असतो, तो जितकी जास्त अण्वस्त्रे संपादन करील तितके आण्विक निःशस्त्रीकरणाला अधिक साहाय्य होते हे डायलेक्टिक सरळ मनाच्या शांतताखोरांना दुर्दैवाने कळत नाही.

## खास कैदी

सोव्हिएट रशियात खास कैद्यांसाठी चालविण्यात येणारी शिबिरे आहेत. त्यांना विशेष व्यवस्थेखालील शिबिरे (स्पेशल रेजिम कँप्स्) म्हणतात. त्यांतील काही कैदी असे : सेमून स्कालिच (६३); हे पौगंडावस्थेपासून पंगू आहेत. १९८० मध्ये त्यांच्या ७०० धार्मिक कविता जप्त करून त्यांना अटक करण्यात आली. त्यांना कुणी नातेवाईक नाहीत व त्यांची गाठभेट घ्यायला कुणी येत नाही असे समजते. बेलिस गायोस्कास (५७); १९७८ साली त्यांच्यावर करण्यात आलेल्या खटल्यात त्यांनी दुसऱ्या महायुद्धानंतर लिथुएनियाने सोव्हिएट अंमलाविरुद्ध जो प्रतिकार चालविला होता त्याचा

अनुक्रमणिका






अनधिकृत इतिहास लिहिला असा आरोप करण्यात आला होता. १९४८ मध्ये लिथुएनिअन गनिमी कारवायांत सहभागी असल्याबद्दल त्यांना २५ वर्षांची शिक्षा ठोठावण्यात आली होती आणि ती संपल्यावर १९७३ मध्ये त्यांची मुक्तता करण्यात आली. १९७३ नंतर ते मानवी हक्कांना वाहून घेतलेल्या एका नियतकालिकाला लेखनसाहाय्य करीत होते आणि पूर्वी राजकीय कैदी म्हणून शिक्षा भोगलेल्या लोकांना साहाय्य करीत होते. व्हेसिल स्टस, एक प्रमुख युक्रेनियन कवी. १९८० मध्ये पूर्वीच्या कैदेतून सुटका झाल्यानंतर काही महिन्यांतच त्यांना अटक करण्यात आली होती. युक्रेनमधील मानवी हक्कांविषयीच्या परिस्थितीची सतत नोंद घेण्यासाठी संघटित करण्यात आलेल्या एका गटाचे ते सदस्य होते. लिओनिड बोरोडिन (४५) एक रशियन लेखक. त्यांना १९८२ मध्ये त्यांनी अलेक्झांडर सोल्झेनिट्सिन ह्या हद्दपार करण्यात आलेल्या प्रसिद्ध रशियन लेखकाला त्याच्या ६० व्या वाढदिवसानिमित्त अभिनंदनपर तार पाठविली आणि अधिकृत परवानगीशिवाय परदेशात एक पुस्तक प्रसिद्ध केले म्हणून अटक करण्यात आली.

हे खास कैदी कसे राहतात? ते शिबिरात आल्यावर पहिली गोष्ट करण्यात येते ती ही, की त्यांच्याकडे असलेली त्यांच्या खटल्याविषयीची सर्व कागदपत्रे जप्त करण्यात येतात. त्यांच्यावर भरण्यात आलेले खटले म्हणजे सोंग उभे करण्याचा प्रकार असल्यामुळे ह्या खटल्याविषयीची माहिती बाहेर जाऊ नये अशी अधिकारीवर्गाची इच्छा असते. त्यांना देण्यात येणाऱ्या शिक्षाही ठरीव असतात; दहा वर्षे कैद आणि नंतर पाच वर्षे अंतर्गत हद्दपारी.

कोठडीत दोन ते पाच कैद्यांची सोय केलेली असते. प्रत्येकाच्या वाट्याला दोन चौरस मीटर एवढी जागा असते. कैद्यांना दुसऱ्या कोठडीतील कैद्यांना भेटता येत नाही. ह्या राहण्याच्या कोठड्यांशिवाय आणखी दोन प्रकारच्या कोठड्या असतात; कामाच्या कोठड्या आणि व्यायामाच्या कोठड्या. राहण्याच्या आणि कामाच्या कोठड्यांना शौचकूप जोडलेले असतात. कोठडीतून हवा खेळत नसल्यामुळे त्यांची घाण सतत येत असते. कामाच्या कोठड्या काळोखी असतात. दिवसाही विजेचा दिवा लावावा लागतो. काम कष्टाचे नसते, हलके असते; पण कामाचे जे मान ठरवून देण्यात येते ते अतिरेकी असल्यामुळे पुरे करणे कठीण असते आणि यामुळे कित्येकांना शिक्षा भोगावी लागते. राहण्याच्या कोठडीत दिव्याचा प्रकाश अपुरा असल्यामुळे काही वाचणे कठीण असते. डोळे बिघडतात.

व्यायामाच्या पाच कोठड्या आहेत. त्यांतील तीन ५ मी. × ३ मी. आणि २.५ मी. उंच अशा आहेत. व्यायाम तासभर चालतो. दुपारी सूर्याची किरणे कोठड्यांत येतात. पण तुम्हाला कोट काढू देत नाहीत. सगळी बटणे लावून तो तसाच अंगात घालून ठेवावा लागतो. कोठड्यांची रचना अशी आहे, की एकमेकांकडे चिठ्या-चपाट्या पाठवता येणे शक्य नसते. कैद्यांनी एकमेकांशी बोलू नये म्हणून रक्षक पहारा करीत असतो. आणखी ज्या दोन कोठड्या आहेत त्यांच्यात एकांतवासाची सजा झालेले कैदी व्यायाम करतात. त्या २ मी. × २ मी. आणि २.५ मी. उंच अशा आहेत. हे कैदी अर्धा तास व्यायाम करू शकतात.

अन्न वाईट असते. भाज्या जवळजवळ नसतात. जेव्हा असतात तेव्हा शिळ्या असतात. मांस खराब असते. कैद्यांना शिबिराच्या दुकानातून मार्गरिन, तेल, मिठाई विकत घेता येते. कधीकधी टिनमधील मासे, चीज आणि बिस्किटे हीही उपलब्ध असतात. पण महिन्याला ४ रुबलपेक्षा जास्त पैसे यासाठी खर्च करता येत नाहीत. साचलेले पाणी उकळून कैद्यांना पिण्यासाठी पुरविण्यात येत असते. त्याला वास मारत असतो पण ते त्यांना प्यावे लागते.

फक्त जवळच्या नातेवाईकांची पत्रे कैद्यांना मिळू शकतात. इतरांनी लिहिलेली पत्रे कैद्यांना प्रत्यक्षात मिळत नाहीत. अनेकदा आई, मुले, बायको यांनी लिहिलेली किंवा कैद्यांनी त्यांना लिहिलेली पत्रेही जप्त करण्यात येतात. रशियनशिवाय इतर भाषेतून (उदा. युक्रेनिअन किंवा लिथुएनिअन भाषेतून) लिहिलेली पत्रे पोचायला सहा ते आठ आठवडे लागतात. सर्व पोस्टकार्डे किंवा नाताळसारख्या धार्मिक दिवशी पाठविलेली अभिनंदनपर कार्डे जप्त करण्यात येतात. कम्युनिस्ट विचारसरणीच्या दृष्टीने ह्या गोष्टी हानिकारक आहेत किंवा राजकीय दृष्ट्या

त्यांचा वाईट परिणाम होऊ शकेल अशी कारणे यासाठी देण्यात येतात.

कैद्यांनी लिहिलेला कोणताही मजकूर त्यांना जवळ ठेवता येत नाही. लिहिलेले कागद काढून घेण्यात येतात. ह्याचे स्पष्टीकरण देण्यात येते ते असे, की कैद्यांना लेखन करायचा हक्क जरूर आहे पण जे लिहिले आहे ते जवळ बाळगायचा हक्क नाही. अलीकडे कैद्यांकडे असलेली पुस्तके, नियतकालिके आणि वह्याही काढून घेण्यात आल्या. त्यांना फक्त पाच पुस्तके किंवा नियतकालिके जवळ बाळगायला देण्यात आली. या परिस्थितीत कोणत्याही विषयाचा अभ्यास करणे कठीण जाते.

"सोव्हिएटविरोधी चळवळ आणि मतप्रचार" करण्याच्या गुन्ह्याखाली ज्यांना शिक्षा झाली असेल, त्यांना येणाऱ्या पाहुण्यांची भेट घेऊ देत नाहीत. जर एखाद्याला भेट घेऊ दिलीच तर ती एक-दोन दिवसांसाठी असते. सोव्हिएट कायद्याप्रमाणे तीन दिवस भेट घेता येते.

अल्पकाळासाठी ज्या भेटी घेऊ देतात त्या एकदोन तासांच्या असतात. एवढ्या भेटीसाठी मित्रांना किंवा नातेवाईकांना खूप दूरचा प्रवास करावा लागत असल्यामुळे बरेच कैदी या भेटीची सवलत नाकारतात.

ज्या विशेष व्यवस्थेखालील शिबिराचे हे वर्णन दिले आहे, ते १९८० साली उरल पर्वतात सुरू करण्यात आले.

## एल् सॅल्व्हॅडॉरमधील 'मृत्युपथके'

एल् सॅल्व्हॅडॉरमध्ये कुणाचीही अचानक धरपकड होणे, अटकेत टाकलेल्यांचा शारीरिक छळ होणे, माणसे अचानक 'बेपत्ता' होणे ह्या सरावाच्या गोष्टी झाल्या आहेत. याशिवाय 'मृत्युपथकांचा 'ही (डेथ स्क्वॉड) या देशात सर्वत्र संचार असतो. मृत्युपथकातील व्यक्ती साध्या पोषाखात– गणवेषात नव्हे– असतात पण शस्त्रसज्ज असतात आणि त्या कुणालाही देहांताची शिक्षा फर्मावून अंमलात आणतात. ह्या खाजगी व्यक्तींनी स्थापन केलेल्या स्वयंसेवी संघटना आहेत अशी बतावणी करण्यात येते; पण प्रत्यक्षात अधिकृत पोलीस, निमलष्करी आणि लष्करी संघटनांतील व्यक्तीच वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या साक्षात मार्गदर्शनाखाली ही कृत्ये करीत असतात असे मानायला पुरेसा पुरावा आहे.

अलीकडच्या काही महिन्यांत या मृत्युपथकांची वाकडी नजर विद्यापीठातील अध्यापकांकडे वळली आहे. जून १९८० पासून विद्यापीठात लष्कराने तळ ठोकून ते बंद केले आहे. विद्यापीठाचा कब्जा घेण्याच्या कारवाईत २२ माणसे ठार झाली अशी बातमी आहे. सध्या विद्यापीठ राजधानीतील वेगवेगळ्या ठिकाणी सरकारी मदतीशिवाय वर्ग भरवीत असते.

'मृत्युपथकां'च्या नावाने वेगवेगळ्या वर्तमानपत्रांतून जाहिराती प्रसिद्ध करण्यात येतात. त्यांच्यात 'राष्ट्रद्रोही' कारवाया करणाऱ्या प्राध्यापकांची नावे प्रसिद्ध करून त्यांचा धिक्कार करण्यात येतो. नोव्हेंबर १९, १९८३ रोजी "विद्यापीठ–बचावासाठी कम्युनिस्टविरोधी कमँडो" या राष्ट्रीय विद्यापीठातून कम्युनिस्टांचे निर्मूलन करण्याच्या उद्दिष्टाला वाहून घेतलेल्या संघटनेने एक पत्रक प्रसिद्ध केले. त्याच्यात ह्युगो फ्रांसिस्को कारिलो काब्रेरा या कायदा–विभागाच्या प्रमुखाला एक महिन्यापूर्वी जे पळवून नेण्यात आले होते त्याची जबाबदारी या संघटनेने स्वत:कडे घेतली होती. विद्यापीठाच्या आठ अधिष्ठात्यांना ते राष्ट्रद्रोही कारवायांत भाग घेतात म्हणून निलंबित करावे अशी मागणीही त्यांनी ह्या पत्रकात केली. डॉ. जोशे जिलेर्मो ओरेलेना ओसोरियो या कायद्याच्या एका प्राध्यापकाला पळवून नेण्यात आले होते. त्यांचा शारीरिक छळ करण्यात येऊन अखेरीस गळा दाबून त्यांना ठार करण्यात आले. त्यांचे प्रेत २३ ऑक्टोबर १९८३ ला रस्त्याच्या कडेला मिळाले. ते सॅल्व्हॅडॉरमधील बिनसरकारी मानवी हक्क आयोगाचे सल्लागार होते.

गेल्या सप्टेंबर महिन्यात तिघा अध्यापकांना ठार मारण्यात आले होते. अनेक प्राध्यापक बेपत्ताही झाले आहेत.

## मृत्युदंड

गेल्या डिसेंबर महिन्यात एकंदर १७ देशांत मिळून ९३ व्यक्तींना मृत्युदंडाची शिक्षा फर्मावण्यात आली. पूर्वी मृत्यूदंडाची शिक्षा झालेल्या १२५ व्यक्तींना फाशी किंवा अन्य कायदेशीर मार्गाने ठार करण्यात आले.



अनुक्रमणिका

